


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३३९ जानेवारी ते मार्च २०१२

संपादक
**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**

प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका








## अनुक्रमणिका




मुद्रक-प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**एच्. एम्. टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुखपृष्ठ छायाचित्र : **ल. म. कडू**
कव्हर डिझाईन : **श्री. हेमंत सरदेसाई**

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : मार्च, २०१२


*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*


रेग्युलेशन ऑफ न्यूजपेपर्स (सेन्ट्रल रूल्स १९५६, नियम क्र. ८ अन्वये) 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'ची मालकी व इतर तपशिलासंबंधी –
**निवेदन**

नियतकालिकाचे नाव : 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'

प्रसिद्धीचा काळ/भाषा : त्रैमासिक/मराठी

संपादक : डॉ. सुधाकर प्रल्हाद कुलकर्णी

रा. पत्ता : 'सूर' ७, गायकवाड कॉलनी, सावेडी मार्ग, अहमदनगर ४१४००३ (राष्ट्रीयत्व भारतीय)

प्रकाशक : प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ३०

रा. पत्ता : बी/१/१२ रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४६ (दूरभाष - ०२०/२४४७५९६३) (स.१० ते १२ दु. ४ ते ७)

राष्ट्रीयत्व : भारतीय

मुद्रक : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ३०

प्रकाशक स्थळ : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ४११०३० (महाराष्ट्र राज्य - भारत) (दूरभाष : ०२०/२४४७५९६३)

मी, प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक मार्ग, पुणे ४११०३०; असे जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे खरा व बरोबर आहे.

– प्रा. मिलिंद गोविंदराव जोशी (प्रकाशक)

संपादकीय

# काळोखाचा राजपुत्र!

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

अस्तित्ववादी साहित्याचा न-नायक जीवनातील अभावग्रस्तता, अगतिकता, धनदांडग्यांच्या जुलुमाखाली पिचलेला, आत्महीनतेच्या जाणिवेने कुंठित झालेला 'प्रतिबद्ध' असून नियतीशरण व वैफल्यग्रस्त झालेला आहे. वसंत आबाजी डहाके यांच्या 'योगभ्रष्ट' (१९७२) 'शुभवर्तमान' (१९८७) आणि 'शुन:शेप' (१९९६) मधील न-नायकाला काळाची 'चित्रलिपी' (२००६) वाचता येत नाही. त्यांच्या लघुकादंबऱ्यांमधील नायक विशेषत: 'प्रतिबद्ध' मधील विनायक आणि 'मर्त्य'मधील सदाशिव असेच हतबल झालेले आहेत. ह्या जगात आपण उपरे (Outsider) असल्याच्या भावनेने ते पछाडलेले आहेत. कोसळणाऱ्या शतकातील संवेदनाशील आणि तत्त्वनिष्ठ तरुणाची ही एकच प्रतिमा आहे. गेल्या शतकातील भ्रष्टाचाराच्या आणि सभ्यतेच्या बुरख्याआड दडलेल्या संभावित गुन्हेगारांच्या चेहऱ्यांनी तरुणांचीच काय; परंतु भल्या-भल्या विचारी माणसांचीही बुद्धी कुंठित झाली आहे. स्वप्नातही दिसणार नाही, असे भ्रष्ट वर्तन पाहून न्यायदेवताही आश्चर्यचकित झाली असल्यास नवल नाही. मग संवदेनाशील कविमनाची काय अवस्था होत असेल; त्याची कल्पनाही करणे नको! संवेदनाशील मनाला सतत दुष्टस्वप्नेच पडतात. 'मर्त्य' कादंबरीतील सदाशिवाला तर इतकी पराकोटीची आत्महीनता येते, की त्याला ईश्वरही – मत्सरी, वाकुल्या – दाखविणारा, जुलमी आणि घृणास्पद आनंदात मग्न असलेला वाटतो! हे शतक आपलं नाही. असलंच तर ते 'भग्नावशेषाचं, सूडाने पेटलेलं, किंवा वेड्यांच्या इस्पितळासारखं वाटतं.' सारं शहर सत्ताधीशांच्या पाशवी पिळवणुकीने रक्तबंबाळ झाल्यासारखं वाटतं!

मूल्यांच्या पडझडीत माणूस गोंधळला आहे. भयभीत झाला आहे. अनेक प्रकारच्या दहशतींनी ग्रस्त झाला आहे. अशा परिस्थितीतही माणूस 'सृजनाची वाट' शोधू पाहतो. ही सृजनशक्ती सांभाळली पाहिजे; असे ह्या हतबल झालेल्या न-नायकाला वाटते. मग 'प्रतिबद्ध' मधील एकाकी, नावगाव हरपलेला, ओसाड झालेल्या शहरातही तो 'आशू' ला जीवाच्या कराराने शोधू पाहतो. आपल्या प्रियव्यक्तीच्या सहवासात काही प्रेरणा लाभते का, तेही शोधण्याची धडपड करतो. हा शोध म्हणजे 'तेथे चल राणी...!' सारखा पलायनवाद नाही. कोठेतरी अज्ञात ठिकाणी, विमानी बसून, ह्या दुष्ट व्यवहारी जगापासून दूर-दूर जाऊ. जेथे शांतता असेल, अन्याय नसेल. जेथे फक्त प्रेमाचीच सत्ता असेल. जुलूम नसेल. अशा 'स्वप्नातल्या स्वर्गात' जाण्याचे दिवास्वप्न पाहणारा पलायनवादी माणूस, ह्या जुलुमाचा केव्हा शिकार होईल, ते त्यालाही समजणार नाही! मग परिस्थितीशी झुंजावे; तर तेवढेही बळ नाही! कुणीतरी 'सुपरमॅन' यावा. त्याच्या एकट्यात शंभर हत्तींचे बळ असावे. त्याने गुन्हेगारांचे अड्डे नष्ट करून समाज भयमुक्त करावा. नाहीतर कुणीतरी, 'महात्म्या'चे बळ घेऊन, चारित्र्यवान सत्पुरुष यावा. याने क्रांतीची मशाल घेऊन पुढे व्हावे. त्याच्या सद्वर्तनाच्या प्रभावाने समाजपरिवर्तन– सत्तापरिवर्तन व्हावे. तोपर्यंत प्रतीक्षा करावी. मग काय करावे! तोपर्यंत आपण आपले भोग भोगलेच पाहिजेत. अशा भोंगळ तत्त्वज्ञानाच्या गुंगीची गोळी घेतली, की सर्व काही सुसह्य होते. सृजनाची शक्ती हरवून जाते. परंतु डहाके यांच्या 'अंधाराच्या राजपुत्रा'चे मन इतके मेलेले नाही. तो ह्या शक्तीला, प्रयत्नांच्या



अनुक्रमणिका

पराकाष्ठेने, जपू पाहतो. ही सृजनाची शक्ती त्याला प्रत्यक्ष-प्रमाण, ह्या नात्याने निसर्गात दिसते. हजारो वर्षे उन्हाळे-पावसाळे पाहिलेला निसर्ग हा सृजनाचा दूत होऊन माणसाला नित्य-नूतन आवाहन देत असतो.

वेदकाळापासून माणूस ह्या सृजनशक्तीला आदिशक्तीला आवाहन करीत आहे. डहाकेंचा कुंठित पुरुष अखेर ह्या स्वत:मधील चैतन्यशक्तीवरच भिस्त ठेवून आहे. 'ईश्वराचा खून' अनेक वेळा झाला असेल. अस्तित्ववादाने त्याला केव्हाच सेवानिवृत्त केले आहे. असेलही! पण देवापेक्षा देवमाणूस अजूनही सेवेत रुजू आहे. त्यावर सर्वांचा विश्वास आहे. अंधाराच्या राजपुत्राचा स्वत:वर विश्वास आहे. त्याने 'उद्धरेतात्मनात्मानं' वाचले नसेल; पण त्याला हे नक्की माहीत आहे की, "वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा । येरांनी वहावा भार माथा ।' शब्दज्ञांनी कितीही भूलथापा मारल्या तरी अंधारातून प्रकाशाकडे जाण्याचा मार्ग त्याला उपजतच माहिती आहे. सूर्य ही प्राणशक्ती आहे; आणि सूर्यमंडल हे त्याचे दृश्यरूप आहे. हे त्याला माहिती आहे, म्हणूनच तो 'सुर्व्या'ला नमस्कार करतो. मरुत्-गणांचा त्याला परिचय नसेलही पण –

*...'आज पुन्हा सूर्य फुलासारखा कोमल वाटतो आहे–*
*नुकतीच उमललेली शुभ्र-तांबडी कमळफुळं*
*तुझी आठवण करून देतात...'*

म्हणून तो सृजनाची प्रार्थना करतो. आपल्या प्रत्यक्ष सृजनकार्यात– ह्या निसर्गदेवतेचा तो धावा करतो. त्यावरच आडाखे बांधलेले असतात– 'उत्तर-दक्षिण चमके बिजली... पश्चिम– वाहे वात...' ही पावसाच्या आगमनाची सूचना भाडळी ज्योतिषी ग्रामजीवनात देत होतेच.

सृजनशक्तीला आवाहन करणे, हा युगायुगांचा धर्म आहे. डहाकेंचा न-नायक त्यातून सुटलेला नाही. पंचमहाभूतातून परमेश्वर प्रकटतो. चार हात आणि मस्तकाभोवती प्रभा घेऊन तो प्रकटत नाही. त्याला वेदांनीही केव्हाच 'कार्यमुक्त' केलेले आहे. सृजनशक्ती, मग त्याला देव म्हटले तरी चालेल! त्याला अवगुंठनातून-गूढरूपाने-प्रकटणे आवडते; असे 'ऐतरेयोपनिषदा'च्या प्रथमाध्यायात-तृतीय खंडातील १४ व्या ऋचेत स्पष्ट म्हटले आहे–

*'परोक्षप्रिया: इव हि देवा:'*

'परोक्ष' म्हणजे अप्रत्यक्ष. 'परोक्षप्रिया' म्हणजे ईश्वराला अप्रत्यक्षपणे प्रकटणे, आवडते. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाशरूपाने तो आपले अस्तित्व दाखवितो. हे सर्वांना माहिती आहे. त्यातून मला 'तो' दिसतो. तेथे 'त्याला मी पाहिले' – 'इदं द्र:'! निसर्गाला व्यापून सृजनाचे दुर्दम्य कार्य; सूर्य, चंद्र, वाऱ्यांमधून दर्शविणाऱ्या ईश्वराला मी पाहिले! 'इदं' (हे) 'द्र:' (पाहिले) म्हणून 'इंद्र' हे – सृजनात्मक ईश्वराचे नाव रूढ झाले!

डहाके यांच्या अंधाराच्या प्रवाशाला हा साक्षात्कार व्हावा, ह्यात नवल नाही. वेदांत 'मन' हा चंद्र आहे; आणि इंद्रिये ह्या तारका आहेत. सूर्याची प्राणशक्ती घेऊन ते अंधारात मार्ग दाखवितात. सप्तलोकांपैकी (म्हणजे भू:, भुव:, स्व:, मह:, जन:, तपम् आणि सत्यम् ह्या सप्तलोकांपैकी) 'मह:' चंद्रामुळे प्रकटतो. 'मन' हा चंद्र, इंद्रिये हा तारकागण म्हणून ह्याचे 'मह'त-त्व 'महत्त्व' जाणणे, हेच मानवी जीवनाचे लक्ष्य आहे. ते समजल्यावर डहाके यांचा अंधाराचा प्रवासी काळोखाचाही 'राजपुत्र' झाला असल्यास नवल नाही!

संपादक
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०
भ्रमणभाष - ९७६७६९९३१९

संपर्क :
७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५



अनुक्रमणिका



८५ व्या अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष

## वसंत आबाजी डहाके ह्यांची साहित्यसंपदा

**जन्मदिनांक :** ३० मार्च १९४२

व्याख्याता, शासकीय कॉलेज, १९७१ ते २००२. याशिवाय 'स्टेट इन्स्टिट्यूट ऑफ ॲडमिनिस्ट्रेटिव्ह करिअर्स,' मुंबई, मुंबई विद्यापीठ आणि 'यशदा', पुणे या ठिकाणी अध्यापन.

**प्रकाशित साहित्य :**

**कवितासंग्रह :** योगभ्रष्ट (१९७२), शुभ-वर्तमान (१९८७), शुनःशेप (१९९६), चित्रलिपी (२००६). 'टेररिस्ट ऑफ द स्पिरिट' ('योगभ्रष्ट'चे इंग्रजी भाषांतर, अनु. रणजित होस्कोटे व मंगेश कुलकर्णी, १९९२).

**कादंबरी :** अधोलोक (१९७५), प्रतिबद्ध आणि मर्त्य (१९८१)

**समीक्षा :** समकालीन साहित्य (१९९२), कवितेविषयी (१९९९), मराठी साहित्य : इतिहास आणि संस्कृती (२००५), मराठी समीक्षेची सद्यःस्थिती (२०११)

**संपादित पुस्तके :** निवडक सदानंद रेगे (१९९६)
संक्षिप्त मराठी वाङ्मय कोश (खंड १ ते ३, १९९८, २००४)
वाङ्मयीन संज्ञा – संकल्पना कोश (२००१)
डॉ. बाबासाहेब आंबेडकर : 'अ फोटोबायोग्राफी' (२००७)

**पुरस्कार :** 'चित्रलिपी'साठी साहित्य अकादेमी पुरस्कार (२०१०)
महाराष्ट्र राज्य पुरस्कार कादंबरी आणि कवितेसाठी (१९८१, १९८७)
गंगाधर गाडगीळ पुरस्कार (२००३)
महाराष्ट्र फाउण्डेशन पुरस्कार, 'मराठी साहित्य : इतिहास आणि संस्कृती'साठी (२००५)
'जीवनव्रती'-पुरस्कार, विदर्भ साहित्य संघ (२००९)
शांता शेळके-पुरस्कार, मास्टर दीनानाथ मंगेशकर प्रतिष्ठान (२०१०)
कविवर्य दामोदर अच्युत कारे पुरस्कार (२०१०)
पुणे मराठी ग्रंथालय पुरस्कार (२०११)



अनुक्रमणिका

# अंधारातून येणारे तुझे शब्दशर

– संतोष शेणई

*८५ व्या अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष वसंत आबाजी डहाके यांच्या साहित्यात विद्वत्व आणि कवित्व यांचे सहज संमेलन आहे. काव्य, कादंबरी आणि ललितलेखनाबरोबरच समीक्षक, कोशकार आणि संपादक म्हणून त्यांची साहित्यसंपदा सर्वमान्य झालेली आहे. 'कोसळणाऱ्या शतकाचा साक्षीदार' म्हणून एकीकडे समाज आणि संस्कृतीच्या इतिहासाचे चिंतन करीत कविता, कादंबरी आणि ललित लेखन करतात; तसेच समकालीन साहित्याची चिकित्सक समीक्षाही करतात. प्रस्तुत लेखात, डहाके ह्यांच्या चिंतनशील सर्वस्पर्शी लेखनाचा नेमका परामर्श, संतोष शेणई ह्यांनी घेतला आहे.*

*– संपादक*

भारतीय अध्यात्माने 'मोक्ष' हे माणसाचे अंतिम ध्येयसुख मानले आहे. मोक्षप्राप्तीसाठी असते योगसाधना. या योगसाधनेत काही प्रत्यवाय आला, तर पुन्हा जन्म घ्यावा लागतो, तो 'योगभ्रष्ट.' खूप काही पाहिलेला, खूप काही सोसलेला व्रतस्थ; पण ठेच खाल्लेला योगी. त्या योग्याची अवस्था या 'प्रचंड कीटकगृहासारख्या देठ तुटलेल्या शहरात काळोखाच्या राजपुत्रासारखी' होते. हीच अवस्थानुभूती त्याला पुनःपुन्हा होते, कारण तो 'कोसळणाऱ्या शतकाचा' कवी म्हणून जन्माला आलेला असतो.

वसंत आबाजी डहाके यांनी विसाव्या शतकाचे वर्णन 'कोसळणारे शतक' असेच केले आहे. या शतकाचे साक्षीदार होऊन ते लिहितात : 'मी जेव्हा मागं वळून पाहतो, या मावळत चाललेल्या शतकाकडे, तेव्हा बाजारबुणग्या लोकांचे दंगे पचवून सुस्त पडलेल्या राजवटींची वेटोळी दिसतात; विध्वंसाची एकसारखी पिकं काढून नापीक केलेली पृथ्वी दिसते.' हा अनुभव कवितेची साधना करणाऱ्या योगीपुरुषाला निश्चितच छळणारा आहे. 'योगभ्रष्ट' ही डहाके यांची दीर्घकविता 'सत्यकथा'मध्ये मे १९६६ ला प्रकाशित झाली आणि त्यांच्याकडे सर्वांचेच लक्ष गेले. 'योगभ्रष्ट', 'शुभवर्तमान', 'शुनःशेप', 'चित्रलिपी' या कवितासंग्रहात त्यांनी कोसळणाऱ्या शतकातील घटनांचा वेध घेतला आहे. हा सारा काळ त्याच्या उणे-अधिकासह ठळकपणे त्यांच्या कवितेतून व्यक्त होतो.

डहाकेंची कविता वाचकांचे कधी मनोविनोदन करीत नाही, की श्रोत्यांचे मनोरंजन करीत नाही. ही कविता वाचणारा, ऐकणारा अस्वस्थ होतो. या कवितेतला दाहक अनुभव कोणतीही आडवळणे न घेता थेट समोर ठाकतो; अन् आपण सैरभैर होतो. हा अनुभव छळतो. पण त्याचा हा 'छळवाद' आक्रमक, तिरप्या, बोचऱ्या शैलीत नसतो. आपल्या 'मनाची प्रसन्नता खाऊन टाकण्याइतकी' हिंस्र आहे ही कविता. तरीही ती आपली शांत लय जराही विस्कटू देत नाही. हा स्वभावगुण या कवितेने उचललाय तो डहाक्यांकडूनच.

इथल्या प्रत्येक घटनेने डहाके मनोमन अस्वस्थ होतात. घडोघडी योगभ्रष्ट होण्याचे क्षण समोर येतात, तेव्हाचा अनुभव त्यांना छळणारा असतो: मनात काही खदखद असेलच; पण ते मांडीवर दोन्ही हात जुळवून खालच्या मानेने त्याकडे पाहत शांत असतात. प्रचंड उलथापालथीच्या काळातही एखाद्या व्रतस्थ योग्यासारखेच तपस्वी भाव त्यांच्या चेहऱ्यावर असतात. मात्र, एकीकडे स्थितप्रज्ञ असतानाही ते घटनांबाबत उदासीन, तटस्थ नसतात. त्याविषयीची आपली निरीक्षणे, मनातली खदखद, ते आक्रमकपणे नोंदवत नाहीत; इतकेच. मित्राच्या खांद्यावर हात ठेवून विश्वासाने त्याला समजावून सांगावं तशी त्यांची कविता संवादी होते. ही विश्वासार्हता हा त्यांच्या कवितेचा स्थायीभाव आहे.



अनुक्रमणिका

डहाक्यांची कविता जितकी आत्मसंमुख आहे, तितकीच ती समाजसंमुखही आहे. अस्तित्ववादाचा काळोखा रंग घेऊन येणारी ही कविता आत्महीनतेची जाणीव व्यक्त करते :

*'मी चक्क पुस्तकातील किडा,*
*अत्यंत बिनबुडाचा किंवा बी नसलेले एक रसयुक्त फळ*
*स्वत:च्या चरित्रावर एकसत्ताक राज्य करणारा*
*अथवा एक प्रचंड रुग्णालय'*

अशी आत्मनिर्भत्सना कवी करतो, तेव्हा केवळ व्यक्तिगत पातळीवरची ही आत्मनिंदा नसते. माणसांचा प्रतिनिधी म्हणून तो विश्वपसाऱ्यातील स्वत:चे क्षुद्रत्व इतरांच्याही लक्षात आणून देतो. कोसळणाऱ्या शतकात माणूसपणाला आलेली अवकळा तो सांगतो. माणूसपणाचे विश्वरूप दर्शन होण्याऐवजी खुजेपणाचे दर्शन कवीला तीव्रपणे होत आहे. हे आतून फुटले जाण्याचा अनुभव, छळवाद मांडतो :

*'एक रस्ता आहे काळा माझ्या आत गुदमरलेला*
*मी एक आत्मिक लुटारू भोगतोय हद्दपारी.'*

तुटलेपणाची एक दुखरी नस त्यांच्या सर्वच कवितांतून ठसठसत राहिली आहे. एक प्रकारची अस्वस्थता, ओसाडी, निर्ममता हा कवी अनुभवतोय. त्याच वेळी हिंस्त्र वर्तमानात हतबलतेची, परवशतेची भावना व्यक्त करतोय. 'एखाद्या ब्रह्मराक्षसाने झपाटल्यासारखा' हा मी 'या युगाच्या कातडीवरील एक लहान जळता डाग, एखाद्या माळरानासारखा ओसाड अर्थहीन' असतो. हा मी व्यक्तिगत परकेपण व्यक्त करीत नाही. 'योगभ्रष्ट' ही कविता पाहिली तर विसाव्या शतकाच्या सातव्या दशकातील तरुणाचे नैराश्य, दारुण स्वप्नभंग, वर्तमानाने केलेली कोंडी, त्याची पराभूतता तेथे व्यक्त होते.

या काळातील परात्मभावाने ग्रासलेल्या, कुंठित, निराश आणि संत्रस्त माणसाचे प्रतिनिधित्व करणारा 'मी' डहाकेंच्या कवितेत भेटतो.

डहाके विदर्भातील एका लहानशा गावात वाढले. आयुष्याच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर स्थलांतरे करीत मुंबईसारख्या महानगरात पोहोचले. जीवनाच्या आणि जगण्याच्या वेगवेगळ्या तऱ्हा दाखवणारं हे महानगर आहे. गाव आणि शहर या दोन्हींवर काळाच्या टापा पडलेल्या. तरीही शहराचा नरक होताना गावपणाचं गाणं ऐकू येतंय आत कुठेतरी :

*'झाडातून सळसळ आवाज होतोय.*
*झाड अतिशय उच्च स्वरात गातंय.*

*मी कोंडून ठेवतोय झाडाचं गाणं*
*माझ्या आत गच्च*
*अलीकडे, सांप्रत, आजकाल, सद्य:स्थितीत'*

एकीकडे 'सांप्रत'चा, 'आजकाल'चा, 'सद्य:स्थितीत'ला शहरी ताण आहे आणि दुसरीकडे झाडाचं गाणं. हे गाणं आहे सळसळतं. शांत. या दोन्हीतला आंतरिक ताण डहाकेंच्या कवितेत नाट्यपूर्ण पीळ भरतो. कधी कधी हे गाणं समुद्राच्या गाजेतून भेटतं. 'दूरस्थ शहरात भयसूचक घंटेचा घणघण आवाज ऐकत' चालत राहण्याचा नाइलाज होतो, त्यावेळी समुद्राच्या सहवासात एखादा निवांत क्षण लाभतो. त्यावेळीही 'रक्ताळलेल्या घोड्यासारखा' किंवा 'पिंजारलेल्या दाढी – झिंज्यांचा समुद्र' भेटतो. सर्वव्यापी भय, दहशत यातून समुद्रही सुटत नाही.

चांद्यात पाहिलेल्या अवाढव्य प्रतिमांचं चेटूक त्यांच्यावर आहे.

*'तर हे कवितेच्या देवा*
*तू आपली प्रचंड दगडी पावलं*
*या शब्दाशब्दावर ठेवीत जा'*

अशा ओळीतून त्यांच्या कवितेत या दगडी प्रतिमा उमटत राहिलेल्या दिसतात.

या दगडी प्रतिमा, त्यातील विविध चेहरे यातून उमगलेली संवेदना, त्या परिसरातील माणसं, त्यांचं जीवन, लोकजीवन, त्यातील दैनंदिन व्यवहार, लोकभावना या सगळ्यांचं एक अनोखं मिश्रण 'योगभ्रष्ट'

या कवितेत सापडतं. तर, 'सर्वत्र पसरलेली मुळं'सारख्या दीर्घकवितेतून अस्तित्ववादी जाणिवेचा विराट प्रत्यय येतो.

ढासळलेलं मानवी भविष्य साकारतानाच माणसाच्या मूलभूत विद्रोही शक्तीचा अंदाज घेण्याचा प्रयत्नही ते करतात. पण त्याच वेळी त्यांना किडलेली माणसं, त्यांचा कुजलेला मूल्यभाव, समाजजीवनातील अस्थिरता दिसते. त्यातून चिंतनाला एकांगीपणा येत गेलेला दिसतो. त्यातूनच 'ईश्वराचा खून केव्हाच झाला आहे' असे जाहीर करून ते ईश्वरी संकल्पनेचा निषेध करतात. दिलासा देणारी ईश्वरी बाह्य प्रेरणाही नसल्याने ते अनुभवतात,

'पिळवटलेल्या
आत्म्यावर
एकांताचा
फणा.'

सध्याच्या काळात आपल्या आयुष्यातील बऱ्याच गोष्टी उलगडत नाहीत. त्यांचं आकलन होत नाही. कवीला न वाचता येणारी ही जणू काही वर्तमानकाळाची चित्रलिपी आहे. या 'चित्रलिपी'तून मानवी जीवनाच्या विभिन्न अंगांचा वेध घेण्याचा प्रयत्न दिसतो. माणसाच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक शोषणावर या कवितेने भाष्य केले आहे. विसाव्या शतकातील सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, धार्मिक, आर्थिक अशा सर्वच क्षेत्रातील महत्त्वाच्या घटनांनी जगाला उन्नतीऐवजी एक प्रकारे अधोगतीकडेच नेले आहे. यासंबंधी प्रश्न निर्माण करीत, समाजातील विविध वृत्ती-प्रवृत्तींवर डहाके यांनी आपल्या प्रत्येक कवितेतून भाष्य केले आहे. अनेक आंतरविरोधी वृत्ती-प्रवृत्तींनी वेढलेल्या वास्तवात जगताना होणारी माणसाची घुसमट, आणि त्यातून त्याला पडणारे प्रश्न; हे या कवितेच्या मुळाशी असलेले सूत्र आहे. इथली व्यवस्था उत्तरं देत नाहीच, पण प्रश्नच पडू नयेत असा प्रयत्न करते. मग कवी विचारतो : 'तर हे देवा, प्रश्न न विचारणाऱ्यांच्या, उत्तरं न देणाऱ्यांच्या देशातच मला पुन:पुन्हा जन्माला घालशील काय?'

डहाके यांच्या एकूणच लेखनाचा साररूप आविष्कार म्हणून 'शुन:शेप'मधील 'एक प्रकारची प्रार्थना' ही कविता दाखवता येईल. आजच्या समाज-जाणिवेचे ते एक दर्शन आहे. चारही संग्रहातील त्यांच्या कवितेचा प्रवास समाजवास्तवाच्या अंत:स्तरातील राजकीय सूत्रे पकडणारा आणि त्यांच्या बदलत्या आस्थेचा, करुणेचा साक्षात्कार घडवणारा आहे. सुरुवातीच्या काळातील विचारप्रवाहातील हिंसक आक्रमकता नंतरच्या कवितेत कमी कमी होत गेलेली आणि कवी सम्यक् अनुभूतीकडे वळलेला दिसतो. स्वत:साठी, स्वत:च्या आंतरिक समाधानासाठी आपण जगत नाही, तर आपले जगणे इतरांसाठी आहे, हा अनुभव त्यांची कविता मांडत आली. ते कवितेतून प्रार्थना करतात –

*'मी प्रार्थना करतो मायबहिणींसाठी, मुलांसाठी*
*आजच्या, उद्याच्या फुलांसाठी,*
*फुलांसारख्या मुलांसाठी,*
*मी प्रार्थना करतो तुमच्यासाठी,*
*यांच्यासाठी, त्यांच्यासाठी.'*

तुटलेपणाची जाणीव घेऊन वावरणारा हा कवी प्रत्यक्ष निर्मितीच्या वाटांवर सर्वांना जोडून घेत राहिलेला दिसतो. लघुनियतकालिक चळवळीतील बंडखोरांबरोबर ते होते, पण कधीही अराजकवादी नव्हते. कोणत्याही विचारसरणीच्या दावणीला स्वत:ला बांधून घेणे डहाके यांनी नाकारलेले आहे. साहित्यव्यवहारात गुंतलेल्या माणसांचा समंजसपणा त्यांच्याठायी आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात अनाक्रमकता आहे. पण त्याच वेळी सांस्कृतिक व साहित्यिक दहशतवादाविरुद्ध ठाम व परखड भूमिका ते सतत घेत आले. साहित्यक्षेत्राबाहेरच्या कोणत्याही शुभाशुभ सत्तेसमोर त्यांनी मान तुकवली नाही.

कवितेबरोबरच त्यांचं अन्य लेखनही तितकंच महत्त्वाचं आहे. 'अधोलोक', 'प्रतिबद्ध' आणि 'मर्त्य' या कादंबऱ्याही त्या काळातील अन्य कादंबऱ्यांहून

वेगळे अनुभवविश्व मांडणाऱ्या होत्या. 'मालटेकडीवरून'मधील ललितलेखन वाचकाच्या जाणिवेच्या नव्या खिडक्या उघडणारे आहे. संस्कृतीच्या एका साक्षीदाराने अत्यंत नजाकतीने केलेले हे लेखन आहे. आपली मुळं रुजलेल्या परिसरातून बदलत्या भवतालाचा, साहित्याचा, जगण्याचा वेध घेताना त्यांनी त्याच्या अंत:स्तराचे पापुद्रे उलगडले आहेत. ऐहिक आयुष्यातील प्रवास व त्याच वेळी स्वत:च्या आतला प्रवास सांगणारे 'यात्रा अंतर्यात्रा' हेही ललितलेखन पठडीपेक्षा वेगळे झाले आहे.

'मराठी साहित्य : इतिहास आणि संस्कृती' हा ग्रंथ त्यांच्या प्रगल्भतेची खूण आहे. मराठी साहित्यात कोशकारांची संख्या मुळातच कमी आहे. अशा कामासाठी लागणारा व्यासंग आणि व्यापक दृष्टी असलेली माणसेही दुर्मीळ आहेत. अशा काळात डहाके यांनी 'संक्षिप्त मराठी वाङ्मय कोश,' 'वाङ्मयीन संज्ञा आणि संकल्पना कोश,' 'शालेय मराठी शब्दकोश' संपादन केले. शालेय पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळासाठीही ते संपादक म्हणून काम करीत आहेत. प्रसिद्धीच्या झोतापासून दूर राहात शांतपणे संदर्भ जमवत, त्यांची यथार्थता तपासून पाहात, नोंदी करण्याच्या, वाचन-मनन करीत इतरांनी केलेल्या नोंदींवरही त्या अचूक होण्यासाठी काम करण्यात ते व्यग्र असतात. त्यांची अध्यापकीय शिस्त, अभ्यासू वृत्ती व आस्थाविषय यांचे दर्शन त्यांच्या अन्य कामातही दिसून येते. ते रेखाटनेही करतात. कवितेसारखेच पिचलेल्या माणसांचे चेहरे त्यांच्या रेखाटनातही असतात.

ही रेखाटनेच शब्दातून येतात आणि डहाक्यांची कविता दृकप्रत्यय देते. निसर्गातील वस्तुमात्रांचं जग विरूप होऊन त्यांच्या कवितेत येतं. त्यात काव्यात्मता असते, पण लयशून्य, 'अ-भाव'ग्रस्त अशी असते. त्यातून अगतिकतेचं तत्त्वज्ञान कवी सांगतो. डहाके यांचे समकालीन कवी गुरुनाथ धुरी यांनी या कवितेला कवितेतूनच दिलेला प्रतिसाद खूप बोलका आहे :

*'अंधारातून येणारे तुझे शब्दशर*
*फाडत जातात सुस्थापित शहर*
*अखेर नुस्तं उरतं ते तुझ्या कवितांतील सत्य*
*हाडं हाडं हाडं : डहाके'*

◇◇◇

**संतोष शेणई**

---

## १ एप्रिल २०१०पासूनचे आजीव सभासद

१) डोगरे प्रविण माधवराव, पाचोरा
२) कुमावत ज्ञानेश्वर धोंडीराम, पाचोरा
३) साळुंके विश्वासराव, पाचोरा
४) तांबोली अनघा, बंगलोर
५) बोद्रे शोभा विजय, पुणे
६) घाटे अपर्णा अतुल, पुणे
७) काळे अभिजित चांगदेव, ठाणे
८) मगाई सतीश रेवणसिद्ध, सोलापूर
९) जोशी अभिजित, सोलापूर
१०) यजुर्वेदी व्यंकटेश, सोलापूर
११) लावणीस शशिकांत, सोलापूर
१२) पालकर दीपलक्ष्मी शिवराम, पुणे
१३) घोडके जालींदर रामचंद्र
१४) पाटील नागनाथ सिद्रामप्पा
१५) हिंगोणेकर संजय भाऊराव, जळगाव
१६) लभाणे चंद्रमणी पी, जळगाव
१७) गोखले चारुदत्त श्रीधर, जळगाव
१८) पाटील विद्या रत्नाकर, जळगाव
१९) इंगळे देवेन्द्र समाधान, जळगाव
२०) महाजन जयश्री, जळगाव
२१) भलावतकर भाग्यश्री, जळगाव
२२) कोठारी प्रकाश मांगीलाल, जळगाव
२३) सैंदाणे यशवंत अमृतराव, जळगाव
२४) नवलगुंदकर दत्तात्रय शंकर, पुणे
२५) जाधव समीर दत्तात्रय, पुणे
२६) कुलकर्णी ज्ञानेश्वर, कोल्हापूर
२७) कुलकर्णी एस. एस., दिल्ली
२८) आवनामे गणेश अशोक, डोंबिवली
२९) बोरूडे संजय, अ. नगर
३०) गायकवाड प्रतिक्षा, अ. नगर
३१) शेळके संगीता काकासाहेब
३२) हातावळे उज्ज्वला अनिल, पुणे
३३) कांवळे भालचंद्र, कालापुंडी
३४) गुजराथी उन्मेष पद्माकर, कर्जत
३५) गुजराथी सृष्टी उन्मेष, कर्जत
३६) मोरे मृणाल मुरलीधर, देहगाव
३७) भेलकर रत्नाकर देवरावजी, नागपूर
३८) कुलकर्णी प्रांजली दत्तात्रेय, पुणे
३९) पटवर्धन अजित भास्कर, मिरज
४०) नांदेडकर प्रदिप माणिकराव, पुणे
४१) वाकचौरे लता, मालेगाव कँप
४२) राजापुरे विजय कृष्ण, इचलकरंजी
४३) तेलसिंग पद्माकर, इचलकरंजी
४४) कुलकर्णी स्वानंद मुकुंद, इचलकरंजी
४५) वावगे रुक्मानंद, इचलकरंजी







अनुक्रमणिका

# साहित्य आणि समाजभान

## पहिले युवा साहित्य-नाट्य संमेलन — अध्यक्षीय भाषण

– अच्युत गोडबोले

*अच्युत गोडबोले हे नाव 'तरुणाई'ला प्रेरणा देणारे आहे. त्यांच्या बहुआयामी ज्ञानसेवेतून प्रकट झालेले साहित्य आणि समाज-विषयक विचार मननीय आहेत. आय् आय् टी मुंबई येथून 'केमिकल इंजिनिअर' झालेले, 'सॉफ्टवेअर'च्या क्षेत्रातील जगन्मान्य कंपन्यांमध्ये ३२ वर्षे कामाचा अनुभव घेताना विपुल जगप्रवास करून समाजजीवनाचे चिंतन केलेले, 'कॉम्प्युटर'-व्यवस्थापन-संगीत विषयावरील ग्रंथांचे लेखक आणि विशेष म्हणजे जागतिक पातळीवरील विज्ञान-संशोधनांचा-संकल्पनांचा-निर्मितीचा साक्षेपी इतिहास 'किमयागार' मधून सामान्यजनांना आकलन होईल अशा सोप्या भाषेत लिहिणारे म्हणून त्यांचा सर्वांना परिचय आहे. माध्यमांमध्ये कितीही आधुनिकता आली तरी, खरे समाजपरिवर्तन करणारे साहित्य, सकस सामाजिक-भान असलेल्या मनातूनच प्रकट होते. साहित्य आणि समाजभान यांचे नाते अधोरेखित करणारे हे विचार 'सोशल नेटवर्किंग'च्या जमान्यातही 'श्रोतव्यं, मन्तव्यं, निदिध्यासितव्यं' असेच आहेत.*

*– संपादक*

खरं तर, मराठी साहित्याच्या क्षेत्रात मी स्वत:ला फार मोठा लेखक मानत नाही; पण मराठी ही ज्ञानभाषा कशी बनवता येईल यावर माझा सतत विचार चालू असतो. मी स्वत:ला एक 'इंटिग्रेटर' समजतो. कुठलाही अवघड विषय घेऊन त्यावर भरपूर आणि विविध अंगानं वाचन करून तो मुळापासून प्रथम स्वत: शिकून मग तो सर्वांना समजेल अशा सोप्या, रंजक पद्धतीनं मांडायला मला खूप आवडतं. खरं म्हणजे मला त्यातून शिकायला मिळतं आणि आनंद मिळतो व म्हणून मी हे सगळं करतो. विज्ञानावरचं 'किमयागार', तंत्रज्ञानावरची 'संगणकयुग' आणि 'नॅनोदय', व्यवस्थापनावरचं 'बोर्डरूम', संगीतावरचं 'नादवेध', अर्थशास्त्रावरचं 'अर्थवेद', गुलामगिरीवरचं 'गुलाम' आणि माझं आगामी मानसशास्त्रावरचं पुस्तक 'मनात', अशा पुस्तकांच्याद्वारे इंग्रजीत आत्तापर्यंत उपलब्ध असलेलं ज्ञान मराठीत आणण्याचा मी माझ्याकडून एक छोटेखानी प्रयत्न केला इतकंच. पण लौकिकार्थानं या साहित्यकृती नाहीत याची मला पुरेपूर जाणीव आहे. याचं कारण साहित्यामध्ये उत्स्फूर्तता, सर्जनशीलता आणि नवनिर्मिती या गोष्टी असल्याच पाहिजेत असं मला वाटतं; आणि म्हणून मी स्वत:ला साहित्यकार मानत नाही. पण आजच्या युवकांची स्पंदनं ज्ञानशाखांवर विकसित झाली असल्यामुळेच कदाचित महाराष्ट्र साहित्य परिषद आणि राष्ट्र सेवा दल यांच्या वतीनं आयोजित पहिल्या युवा साहित्य-नाट्य संमेलनाचं अध्यक्षपद मला मिळालं असावं असं मला वाटतं; आणि तो मी माझा बहुमानच समजतो.

हे युवा साहित्य-नाट्य संमेलन आहे; याला खूप महत्त्व आहे. याचं कारण उद्याच्या जगाचं चित्र आजचा तरुणच रेखाटणार आहे. तरुणाईविषयी सुरेश भट म्हणतात,

*'आम्ही जिवंत राहू,*
*आम्हीच ते उद्याचे, आकाश रंग पाहू.'*

आणि भारताच्या बाबतीत बोलायचं झालं तर उद्याची भारताची आर्थिक प्रगती तरुणांमुळेच शक्य होणार आहे. याचं कारण भारत हा जगात तरुणांची संख्या सगळ्यात जास्त असलेला देश आहे. भारतातले २४ कोटी म्हणजे, लोकसंख्येच्या ३५% लोक १०-१९ वयाच्या दरम्यानचे आहेत. २०२० साली



अनुक्रमणिका



भारताचं सरासरी आयुर्मान २९ असेल तर चीनचं ३७ असेल, तर तेच युरोप आणि जपानमध्ये ४५ असेल. म्हणजे बाकीच्या जगाला तेव्हा वृद्धत्वाची समस्या भेडसावत असेल. २०२० पर्यंत अमेरिकेला १.७ कोटी, चीनला १ कोटी, जपानला ९० लाख इतक्या काम करू शकणाऱ्या तरुण लोकांचा तुटवडा भासेल आणि त्याच वेळी भारतामध्ये खूप जास्त प्रमाणात सक्षम तरुणवर्ग असल्यामुळे त्याचा आपल्याला आर्थिक फायदा होण्याची बरीच शक्यता आहे. याला 'डेमोग्रॅफिक डिव्हिडंड' असं म्हटलं जातं.

साहित्य हा समाजाचा अविभाज्य भाग असल्यामुळे त्यात समाजाचं प्रतिबिंब असतं– निदान असलं तरी पाहिजे-असं म्हटलं जातं. त्यामुळे साहित्याविषयी बोलण्यापूर्वी सध्या भारतातली सामाजिक, आर्थिक परिस्थिती कशी आहे हे समजावून घेण्याची गरज आहे. भारतातल्या गरिबीविषयी मतभेद असले तरी सर्वसाधारणपणे निम्मी जनता दारिद्र्यात राहते आणि एक चतुर्थांश लोक हे तर जनावरांसारखंच जिणं जगतात; यात कुणाचंच दुमत नसावं. पुरेसं स्वच्छ पाणी न मिळणाऱ्या जगातल्या सर्व माणसांपैकी एक तृतीयांश म्हणजे ६५ कोटी लोक भारतात आहेत. अजूनही भारतात निम्म्या लोकांना वीज आणि पिण्याचं स्वच्छ पाणी मिळत नाही. पाण्याच्या एका हंड्यासाठी लाखो स्त्रियांना कित्येक मैल अंतर चालावं लागतं. ९०% लोकांना शौचालयाची सुविधा नाही.

'ह्युमन डेव्हलपमेंट इंडेक्स (एचडीआय)' मध्ये १७५ देशांमध्ये आपला नंबर खालच्या २५-३०% देशांमध्ये लागतो. अजून भारतातली ५०% मुलं कुपोषित आहेत. भारतातल्या ५०% स्त्रियांना आणि ७०% मुलांना ॲनिमिया आहे. जिथे शिक्षण आणि आरोग्य यांच्यावर राष्ट्रीय उत्पादनाच्या प्रत्येकी ८-१०% पुढची अनेक वर्षं खर्च करण्याची गरज आहे, तिथे आपण शिक्षणावर फक्त २.९% खर्च करत आलेलो आहोत आणि आरोग्यावर तर १% हून कमी! आपल्याकडे दर ५०,००० लोकांमागे १ आरोग्यकेंद्र पाहिजे, ते दर २,३०,००० लोकांच्या मागे आहे. म्हणजे गरजेच्या एक पंचमांश आहे. आपल्या 'नॉलेज इकॉनॉमीच्या आयटी सुपरपॉवर' असलेल्या देशामध्ये २% लोकांकडे कम्प्युटर आहे. ८% लोक इंटरनेट वापरतात. २०% लोक वर्तमानपत्रं वाचतात; आणि ४०-५०% लोकांना सहीदेखील करता येत नाही! शिक्षणव्यवस्था अशी आहे की, आठवीतल्या बऱ्याच मुलांना चौथीतली गणितंही सोडवता येत नाहीत.

जागतिकीकरणामुळे भारताची काहीच प्रगती झाली नाही असं मुळीच नाही. आर्थिक वाढीचा दर वाढला पण सामान्य माणसांच्या गरजेसाठी लागणाऱ्या साध्या, स्वस्त, टिकाऊ आणि प्रदूषणमुक्त वस्तू तयार करण्याच्याऐवजी खूप ऊर्जा खाणारी, प्रचंड यांत्रिकीकरणामुळे बेकारी निर्माण करणारी आणि आरोग्याला व पर्यावरणाला हानिकारक अशी अनेक शीतपेयं, फास्टफूड, सौंदयप्रसाधनं, मोटारगाड्या, अनेक चैनीच्या वस्तू आणि युद्धसामग्री अशाच चंगळवादी किंवा युद्धखोर गोष्टींवरती जास्त खर्च व्हायला लागला. यालाच आपण आर्थिक वाढ म्हणायला लागलो.

या तीन दशकांत सर्व जगभर गरीब-श्रीमंत दरीही प्रचंड वाढली. या सगळ्या उत्पादनप्रक्रियेत अर्थातच फक्त शिकलेल्या, अगोदरच सुस्थितीत असलेल्या २०-३०% लोकांचाच फायदा झाला. त्यामुळे मध्यमवर्ग आणि विशेष करून उच्च मध्यमवर्ग यांची संख्या वाढली त्या अर्थानं थोडीफार सुबत्ता घरंगळत खाली आली; आणि याच वर्गातल्या लोकांचं सर्व माध्यमांमध्ये वर्चस्व असल्यामुळे माध्यमांमधून-सुद्धा भारत कसा सुधारतोय, गरिबी कशी दूर होतेय, भारत कसा महासत्ता बनण्याकडे वाटचाल करतोय अशा तऱ्हेचंच चित्र बऱ्याच वेळेला सर्वांसमोर रंगवलं गेलं. पण या नवउदारमतवादी अर्थव्यवस्थेनं,

सर्व गरिबी झटपट दूर होईल असं एकेकाळी जे चित्र रंगवण्यात आलं होतं, त्यात नक्कीच गफलत झालेली आहे.

खरंतर जागतिकीकरण हवंच. पुन्हा आपल्याला स्वयंपूर्ण खेड्याकडे जाणं अशक्यही आहे; आणि ते अयोग्यसुद्धा आहे. आंतरराष्ट्रीय व्यापारसुद्धा हवाच; पण तो फक्त एका विशिष्ट वर्गालाच फायदेशीर असणारा असू नये. थोडक्यात, जागतिकीकरणाला मानवी चेहरा हवा, पण हा मानवी चेहरा कुठल्याही दानावर किंवा दयेवर अवलंबून न राहता हक्कांवर आधारित राहिला पाहिजे हे आजच्या तरुणांनी लक्षात घेतलं पाहिजे. उदाहरणार्थ, प्रचंड गरीब-श्रीमंत दरी निर्माण करायची आणि त्यानंतर मुद्दामहून कमी दाखवलेल्या दारिद्र्यरेषेखाली असलेल्या लोकांना स्वस्त अन्न द्यायचं. यापेक्षा सर्वांना रोजगार कसा मिळेल हे सर्वप्रथम बघितलं पाहिजे.

भारतामध्ये अधिकृत आकडेवारीनुसार दर दहांपैकी एक माणूस बेकार आहे. शिवाय एक तर लाज वाटते म्हणून आणि नोंद करून फायदा होत नाही म्हणून, अशा कारणांमुळे यापेक्षाही अनेक पटींनी जास्त लोक त्यांची नावं एम्प्लॉयमेंट एक्स्चेंजमध्ये नोंदवतच नाहीत. तसंच तितक्याच किंवा जास्त लोकांना फक्त दिवसातला थोडाच वेळ काम मिळतं. म्हणजे बेकार आणि अर्धबेकार मिळून भारतातली संख्या ही एकूण लोकसंख्येच्या १०% पेक्षा अनेक पटींनी मोठी आहे. शेतीत तर ती अचाटच आहे. फेरीवाले, वडापाव विकणारे, निरोपे आणि तत्सम स्वयंरोजगारीत, पण दारिद्र्यरेषेच्या काठावर राहणाऱ्या लोकांची संख्यासुद्धा तितकीच मोठी आहे.

या सगळ्यात कळीचा मुद्दा रोजगाराचा आणि चांगल्या, अर्थपूर्ण रोजगाराचा आहे. जर समृद्धी समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत खऱ्या अर्थानं पोहोचायला हवी असेल (ट्रिकलडाऊन) तर संपूर्ण आणि अर्थपूर्ण रोजगार हेच त्याला उत्तर आहे. कारण त्यामुळेच खऱ्या अर्थानं पैसा सगळ्यांच्या हातात खेळू लागेल आणि कोणाच्या तरी दानावर दिवस पुढे ढकलण्यापेक्षा स्वकष्टानं मिळवलेल्या पैशामुळे लोकांचा आत्मसन्मानही वाढेल. पण तिथेच खरा प्रश्न आहे. आजच्या 'जॉबलेस ग्रोथ' मध्ये ते होत नाहीये. जेव्हा आर्थिकवाढीचा दर ७% होता, तेव्हा रोजगारवाढीचा दर १.३% होता! म्हणजे जागतिकीकरण हवं पण त्याचं स्वरूप आणि रचना ही बदलली पाहिजे.

'जागतिकीकरण आता जणू देवानंच दिलंय, आपण ते कसं बदलू शकणार? आपल्याकडे ते स्वीकारून फक्त आपल्यातच त्याला साजेसे बदल करायला हवेत,' म्हणण्याऐवजी रोजगार, पर्यावरणरूप, शिक्षण, आरोग्य यांना प्राधान्य देणारी पर्यायी विकासनीती शक्य आहे हे आता तरुणांनी ठामपणे मांडण्याची वेळ आली आहे. नोबेल पारितोषिक विजेता जोसेफ स्टिग्लिड्झ यानं त्याच्या 'मेकिंग ग्लोबलायझेशन वर्क' यात या सगळ्याचं चांगलं विवेचन केलंय. थोडक्यात, जागतिकीकरणाला खऱ्या अर्थानं मानवी चेहरा दिल्यास आपल्या आर्थिकवाढीचा दर भले का ८% वरून ५% वर येवो, पण आपण पुढच्या २०-३० वर्षांत एक सक्षम, सुशिक्षित, सुदृढ आणि सकारात्मक असा भारत निर्माण करू आणि असं झालं तर महासत्ता होण्यापेक्षा ते जास्त ग्रेट असेल! पण आजच्या नवउदारमतवादी अर्थव्यवस्थेत हे होणं अवघड आहे. त्यामुळे आजच्या तरुणांनी अशा तऱ्हेचा समाज निर्माण करण्याकरता हट्ट आणि आग्रह धरला पाहिजे व वेळ पडली तर त्यासाठी चळवळीही केल्या पाहिजेत.

आत्तापर्यंतच्या जगातल्या सगळ्या मोठ्या परिवर्तनांमध्ये साहित्यिकांचा खूप मोठा सहभाग होता. मग ती फ्रेंच राज्यक्रांती असो किंवा रशियन राज्यक्रांती असो वा भारताचा स्वातंत्र्यलढा असो. आजूबाजूच्या या भीषण परिस्थितीवर साहित्य निर्माण करण्याची



अनुक्रमणिका

कोणी सक्ती जरी केली नाही तरी अशा परिस्थितीत कुठलाही संवेदनशील साहित्यिक 'माझा या परिस्थितीशी काय संबंध? मी बरा आणि माझं लिखाण बरं', असं म्हणूच शकणार नाही, हेही तितकंच खरं! म्हणजे कुठल्याही संवेदनशील साहित्यिकाच्या लिखाणात आपोआपच या परिस्थितीचं प्रतिबिंब डोकावेल आणि तसं ते डोकावायला हवं.

गेल्या २० वर्षांत नुसतीच गरीब-श्रीमंत दरी आणि बेकारी वाढली असं नाही तर खूप मोठ्या प्रमाणावर खोटी कारणं देऊन लादलेली युद्धं वाढली. हिंसाचार आणि उद्ध्वस्तता वाढली. दहशतवादानं जगाला घट्ट विळखा घातला आणि खासगीकरण जोरात वाढल्यानं आता भ्रष्टाचार कमी होईल असं वाटलं होतं, तो प्रचंडच वाढला आणि जगभर वाढला. याचबरोबर सर्व जगाची सांस्कृतिक घसरण खूपच झाली. ही परिस्थिती एवढी भयानक आहे की, सगळी चॅनेल्स सासू-सून यांच्या मालिका, कुठल्या तरी बाबांची प्रवचनं, गुदगुल्या केल्याशिवाय हसू येणंच शक्य नाही अशा विनोदांच्या स्पर्धा, गाण्याच्या भेंड्या, मोटारींच्या शर्यती, उच्चवर्गीय संस्कृतीचं प्रदर्शन करणारे 'बिग बॉस' सारखे 'रिॲलिटी शोज', वहिनींच्या फुगड्या, अत्यंत हिडीस कपडे घालून केलेल्या नाचाच्या स्पर्धा, राशीभविष्य आणि कुठल्या तरी काल-परवाच आलेल्या अभिनेत्यांच्या मुलाखती अशा तऱ्हेच्या गोष्टी दाखवण्यात गुंग होती आणि आहेत, ही खरी शरमेची गोष्ट आहे. संस्कृतीचं एवढं थिल्लरीकरण, अधोगती आणि दिवाळखोरी कधीच बघायला मिळाली नव्हती! या चॅनेल्सवरती शैक्षणिक आणि कुठलेही गंभीर चर्चेचे प्रश्न तर सोडाच पण कुठलेही शास्त्रज्ञ, गणिततज्ज्ञ, शास्त्रीय गायक-वादक, चित्रकार, शिल्पकार, कवी, लेखक, नर्तक-नर्तिका यांचे 'इंटरव्ह्यूज' जितक्या वेळा येतात, त्याच्या शंभरपटींनी 'इंटरव्ह्यूज' हे कुठल्या तरी सीरियलमध्ये काम करणाऱ्या नटनट्यांचे येतात आणि तेच आपल्या आयुष्यातले आदर्श होऊन बसतात. कुठल्याही सीरियलमध्ये जवळपास एकही खरं वाटावं असं खेड्यातलं दृश्य नसतं किंवा कारखान्यातले कामगार दाखवले जात नाहीत. एवढंच काय साध्या मध्यमवर्गाचंही चित्रण नसतं. फक्त सगळी श्रीमंत मंडळी प्रचंड भरजरी कपड्यांमध्ये एकत्र जमून कुठल्या तरी 'परिवाराविषयी' बोलत असतात. इतर काहीच बघायला मिळत नाही म्हणून कित्येक मध्यमवर्गीय लोक तेच बघत बसतात आणि वाईट भाग हा की त्याचं कित्येकदा अनुकरणही करत बसतात. दूरदर्शनवर 'डिस्कव्हरी' किंवा 'नॅशनल जिओग्रॅफिक' अशी चॅनेल्स सोडली तर विज्ञानासाठी एकही चॅनेल नसते.

'किमयागार' या माझ्या पुस्तकामधील काही वाक्यं उद्धृत केल्याशिवाय मला राहावत नाही. गेल्या वीस वर्षांत विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या प्रगतीपेक्षाही धर्मांधपणा आणि अंधश्रद्धा यांची वाढ जास्त मोठी झाली. एकीकडे इंजिनियर व्हायचं, आधुनिक विज्ञान शिकायचं आणि प्रमोशन मिळवण्यासाठी शिर्डीला जायचं. सगळी संतमंडळी सांगून थकली की, फक्त माणुसकी ही महत्त्वाची. पण आपण सगळी सुशिक्षित मंडळी दरवर्षी कोट्यवधी रुपये आणि अब्जावधी दिवस हे मूर्तिपूजा करण्यात, देवळं बांधण्यात आणि त्या देवळांच्या नावाखाली प्रेमाऐवजी द्वेष, राजकारण आणि हिंसा पसरवण्यात, देव ही खासगी, वैयक्तिक श्रद्धेची बाब न मानता ती रस्त्यावर आणून दंगली पसरवण्यात, देवाला पेढे, पैसा वगैरेंची लाच देण्यात, काळा पैसा पचावा म्हणून देवाची स्तुती करण्यात, त्याच देवाला समुद्रात बुडवून प्रदूषण वाढवण्यात आणि सगळ्यांना अंधश्रद्धेच्या काळ्या सागरात बुडवून टाकत खर्च करत असतो. इथे पैसे देऊन देवदर्शनही 'फास्ट ट्रॅक' मध्ये मिळतं! शिकलेले, सवरलेले लोक बावांच्या, साधूंच्या नादी लागतात (हे साधू-बाबा-गुरू मात्र विज्ञान-तंत्रज्ञानावर चालणाऱ्या





अनुक्रमणिका

टेलिव्हिजन, मायक्रोफोन, मोटारकार, विमान वगैरेंचा भरपूर वापर करत हे 'मटीरियल' जग आपल्याला मात्र नाकारायला शिकवतात!) आपल्याला मग गणपती दूध प्यायल्याचे भास होतात. मग प्रयोगशाळेतल्या उपकरणांची दसऱ्याला पूजा होते, कम्प्युटरसमोर नारळ फोडण्यात येतात, मुहूर्त बघून शास्त्रज्ञ प्रयोग चालू करतात, विज्ञानाच्या पेपरच्या अगोदर विद्यार्थी देवळात जाऊन येतात, विज्ञानसंशोधन केंद्रांमध्ये सत्यनारायणाच्या पूजा होतात, शिकलेले लोकही वास्तू आणि 'फेंगशुईंच्या' मागे लागतात, अनेक इंजिनियर्स, डॉक्टर्स, शास्त्रज्ञ साईबाबा किंवा तत्सम कुणी गुरुंच्या मागे लागतात! 'ॲस्ट्रॉनॉमी'पेक्षा 'ॲस्ट्रॉलॉजी'वर जास्त लोक विश्वास ठेवतात. सगळं 'नॉर्मल' असतानाही ज्योतिषाप्रमाणे जन्माची वेळ येण्यासाठी लोक मग सीझेरीयन ऑपरेशन करून घेतात (त्यातही मुलगी होणार असेल तर गर्भपात कित्येकदा अगोदरच केलेला असतो!), राजकारणी निवडणुकांचा फॉर्म भरताना आणि चित्रपटनिर्माते चित्रपट सुरू करण्याअगोदर 'न्यूमरॉलॉजी'चा आदेश पाळतात आणि हेच आपले आजचे आदर्श असल्यानं मग इतरांचं काय विचारता? कुणाची विश्व निर्माण करणाऱ्या एखाद्या शक्तीवर वैयक्तिक श्रद्धा असली तरी ती एक खासगी बाब असते. त्याला कुणाचाच आक्षेप नसावा. पण अध्यात्माचा हा हिडीस सार्वजनिक बाजार आपल्या आयुष्याचा एक मोठा, अविभाज्य भाग बनलाय ही मात्र एक भयानक गोष्ट आहे!

तर आपण आज अशा जगात राहतो आहोत. आता कोणी म्हणेल की या सगळ्याचा साहित्याशी काय संबंध? आणि इथेच खरी गोम आहे. मला असं वाटतं की, याचा साहित्याशी खूप घनिष्ठ संबंध आहे. कारण साहित्य हे शेवटी समाजाचं प्रतिबिंब असतं, निदान असायला तरी हवं. 'कलेसाठी कला की समाजासाठी कला' या संदर्भात पूर्वी एक वाद खदखदत होता. 'कलेसाठी कला' असं म्हणणारे ना. सी. फडके आणि 'समाजासाठी कला' असं म्हणणारे वि. स. खांडेकर यांच्यात यावरूनच तर खडाजंगी झाली होती. मला स्वत:ला मात्र कुठल्याही कलेची निर्मिती कुठली तरी विचारसरणी समोर ठेवून बळजबरीनं होऊ शकते असं वाटत नाही आणि तशी ती झालीच तर ती उत्कृष्ट कला असण्याची शक्यता फारच कमी असेल, असं मला वाटतं. अशा तऱ्हेचं लिखाण हे उत्कृष्ट प्रचारसाहित्य होऊ शकतं पण सर्वोत्तम साहित्यकृती नव्हे. तांत्रिक गोष्टी मुद्दामहून कष्ट करून कुठल्या तरी उद्देशानं बनवता येतात. पण कलेची निर्मिती मात्र झपाटल्यासारखी, निर्हेतूक, सर्जनशीलतेतूनच होत असते आणि ती तशीच व्हायला हवी. कलाकाराच्या आत्मानंदासाठी उत्स्फूर्तपणे चांगल्या दर्जाची कला निर्माण होऊ शकते यावर माझा दृढ विश्वास आहे. कम्युनिस्ट राज्यांमध्ये कला ही फक्त कम्युनिस्ट राजवटीचा प्रचार करण्याकरता असावी असा हट्ट मार्क्स आणि लेनिन यांनी जरी धरला नसला तरी नंतरच्या कम्युनिस्ट राजवटींमध्ये तो अट्टाहास सतत दिसून आला. मॅक्झिम गॉर्कीसारख्या प्रसिद्ध लेखकालासुद्धा बंधनात राहूनच लिखाण करावं लागलं. डॉ. झिवॅगो ही सुप्रसिद्ध कादंबरी लिहिणाऱ्या पास्तरनॅक या रशियन लेखकाला मिळालेलं नोबेल पारितोषिक राज्यकर्त्यांच्या दडपणामुळे नाकारावं लागलं तर सोल्झेनित्सिन या नोबेल पारितोषिक विजेत्या लेखकानं रशियातल्या छळछावण्यांबद्दल लिहून ते जगासमोर आणल्याबद्दल त्याला १९७४ मध्ये रशियातून हद्दपार व्हावं लागलं होतं.

'कलेसाठी कला' हे जरी खरं असलं आणि कुठलंही साहित्य हे बळजबरीनं कुठल्या तरी विचारसरणीसाठी निर्माण करता येत नसलं तरी एक गोष्ट मात्र आपण लक्षात ठेवली पाहिजे, ती म्हणजे कुठलाही लेखक पोकळीत तरंगत नसतो. त्याच्या जाणिवा, त्याचे अनुभव आणि त्याचं वाचन या गोष्टी त्याच्या आजूबाजूचा समाज, तो स्वत: कुठल्या

वर्गातून येतो, त्याच्यावर होणारे संस्कार अशा सगळ्यांवर ठरतात. एकूण साहित्याचं किंवा कोणत्याही कलेचं नियमाबरहुकूम उत्पादन करून घेता येत नाही. पण हे जरी खरं असलं तरी लेखक किंवा कुठलाही कलाकार यांचा पहिला संबंध जीवनाशी, त्यातल्या विविध समस्यांशी, त्यातल्या संघर्षाशी आणि अनेकविध अनुभवांशी असतो. माणसाच्या जीवनातल्या सत्व, सौंदर्य, संघर्ष या सर्व गोष्टी समृद्ध आणि चांगल्या साहित्यातून मांडल्या जातात आणि यामुळे जरी कुठलंही लेखन प्रचारात्मक दृष्टीतून केलेलं नसलं तरीही त्या लेखकाचे अनुभव आणि त्याचा एकूणच जागतिक दृष्टिकोन त्याच्या लेखनाला आकार देत असतो.

मला असं वाटतं की, सर्व कलांमध्ये साहित्य हे एका बाबतीत सर्वश्रेष्ठ आहे. याचं कारण आपल्याला साहित्य एकाच वेळेला इतिहास आणि भूगोल या दोन्हींमध्ये खोलवर डुबकी मारू देतं. पूर्वीच्या काळी माणूस कसा राहत होता, त्याची सुखदु:खं काय होती, हे त्या त्या वेळच्या साहित्यावरून आपल्याला समजतं. हे झालं इतिहासाचं डायमेन्शन. तसंच एकाच वेळी भारतातल्या किंवा अमेरिकेतल्या किंवा ब्राझीलमधल्या किंवा जर्मनीतल्या माणसांच्या आयुष्याची चित्रणंसुद्धा आपल्याला त्या त्या ठिकाणच्या साहित्यातून बघायला मिळतात. हे झालं भूगोलाचं डायमेन्शन. या अर्थानं साहित्यामुळेच आपल्याला एका तऱ्हेनं सर्व जगातल्या विविध भौगोलिक भागांत राहाणाऱ्या अनेकांची प्राचीन काळापासून ते आत्तापर्यंतची आयुष्यं जगण्याचाच आनंद मिळतो. हा एवढा इतिहास आणि भूगोल यांना ओलांडणारा विस्तृत अनुभव आणि आनंद दुसरी कुठलीच कला देऊ शकत नाही. यामुळेच काही तत्त्वज्ञ साहित्याला सर्वोच्च कला मानत.

चांगल्या साहित्यासाठी समाजातल्या अनेक थरांमधल्या जीवनाविषयी जवळून माहिती पाहिजे आणि त्याच्याशी भिडलं पाहिजे. नाहीतर ते साहित्य म्हणून मर्यादित राहील आणि इथेच मला एक मोठा प्रश्न पडतो. तो म्हणजे साहित्य जरी बळजबरीनं एखाद्या विचारसरणीसाठी तयार होत नसेल तरी आजूबाजूचं ५०-६०% लोकांचं भयाण वास्तव हे कित्येक साहित्यिकांना दिसत कसं नाही? म्हणजे सक्ती नसली तरी आपणहूनच आपल्याकडलं ६०% साहित्य हे ६०% जनतेच्या सुखदु:खाशी भिडणारं आणि उरलेलं ४०% साहित्य हे वरच्या ४०% लोकांच्या सुखदु:खाशी भिडणारं असं खरं तर पाहिजे. पण होतंय उलटंच. काही अपवाद सोडल्यास बहुतांशी सगळं साहित्य हे मध्यमवर्गानं मध्यमवर्गासाठीच लिहिलेलं असतं. जगाच्या बाबतीत बोलायचं झालं तर जगातल्या सर्वात खालच्या थरातल्या ७०% लोकांच्या जीवनातल्या संघर्षाविषयीच्या पुस्तकांची संख्या ही जेमतेम केवळ २% आहे आणि उरलेल्या ३०% मध्यम आणि श्रीमंत वर्गासाठी मात्र ९८% पुस्तकं लिहिली जातात. याचमुळे 'उपरा'कार लक्ष्मण माने यांनी या साहित्याला 'साडेतीन टक्क्यांचं साहित्य' म्हटलं होतं.

असं होण्याची अनेक कारणं आहेत. मुख्यत्वे प्रकाशन व्यवस्थेतलं अर्थकारणच असं आहे की, लोकांच्या मागणीप्रमाणे त्यांना पुस्तकं छापावी लागतात. आजकाल सुशिक्षित मध्यमवर्गामध्ये लोकांना खाद्यपदार्थ, स्वयंपाक, प्रवासवर्णनं, गुंतवणुकीचे मार्ग, यशस्वी होण्याचे मार्ग, व्यक्तिमत्त्व विकास, करिअर, अध्यात्म अशा सगळ्या गोष्टींमध्ये रस असल्यामुळे किंवा माध्यमांनी तो रस आणखीनच जास्त निर्माण केल्यामुळे अशीच पुस्तकं जास्त खपतात आणि म्हणून त्यांचं उत्पादन खूप मोठ्या प्रमाणावर होतं. त्यामुळे प्रकाशित पुस्तकांतल्या कथा, कविता आणि कादंबरी या विषयांचं प्रमाण हे खूपच घटत चाललंय. कवितांची पुस्तकं काढायला तर फारसं कोणी धजावतच नाही. अशा परिस्थितीत खेड्यापाड्यातून आलेल्या अनोळखी साहित्यिकांकडे कोण बघणार? कित्येक प्रकाशकांकडे



अनुक्रमणिका

नवीन पुस्तक छापायचं की नाही हे ठरवण्यासाठी त्याचं पहिलं वाचन करायचं म्हटलं तरी त्यासाठी कित्येक वर्षं लोटतात. त्यामुळे अशा लेखकांना चांगल्या प्रकाशकांकडून पुस्तक प्रकाशित करणं हे जवळपास अशक्यप्राय होऊन बसतं. दुसरा प्रकाशनाचा मार्ग म्हणजे इंटरनेटचा. पण जिथे कम्प्युटरच वापरणाऱ्यांची संख्या भारतामध्ये २% आहे आणि इंटरनेट वापरणाऱ्यांची संख्या ८% आहे आणि अर्थातच हे सगळे लोक बहुतांशी मध्यम किंवा उच्च वर्गातले आहेत. तर अशा परिस्थितीत इंटरनेटवरून साहित्य प्रकाशित करणं आणि ते सर्वांपर्यंत पोहोचवणं हे निदान आजमितीला तरी बहुतांशी तळागाळातल्या लेखकांना शक्य नाही. म्हणून अशा दुर्लक्षित राहिलेल्या पण प्रतिभावंत साहित्यिकांना शोधून काढणं, त्यांना व्यासपीठ निर्माण करून देणं आणि प्रोत्साहन देणं याची आज नितांत गरज आहे. नाहीतर लाखो शेक्सपिअर, केशवसुत किंवा मर्ढेकर आयुष्यभर कुठेतरी गुरं हाकत किंवा कपबशा विसळत बसतील! हे काम युवा साहित्य-नाट्य संमेलन करत राहील अशी मी आशा बाळगतो आणि म्हणूनच प्रथम असं युवा साहित्य-नाट्य संमेलन भरवल्याबद्दल आयोजकांचं पुनश्च अभिनंदन!

मात्र चांगलं साहित्य निर्माण करण्याकरता जीवनाला भिडलं पाहिजे आणि त्यातल्या सर्व थरांतल्या लोकांच्या सुखदु:खाचा प्रत्यक्ष अनुभव साहित्यिकाने घेतला पाहिजे किंवा निदान त्याविषयीचं वाचन आणि खोलवर निरीक्षण तरी केलं पाहिजे. या दोन्ही गोष्टी जे करत नाहीत, त्यांचं साहित्य अर्थातच मर्यादित राहतं आणि काहीच काळात कालबाह्य होतं. जवळपास एका शतकानंतरसुद्धा डोस्टोव्हस्की, हेमिंग्वे, स्टाईनबेक अशांसारखे अनेक लेखक हे जगामधले सर्वोत्तम लेखक मानले जाण्याचं कारणच त्यांचं जीवनाला भिडणं हे होतं. स्पॅनिश यादवी युद्धामध्ये हेमिंग्वे प्रत्यक्ष बंदूक घेऊन लढला. १९३० सालच्या महामंदीचे स्टाईनबेकनं अनुभवलेले चटके त्याच्या 'ग्रेप्स ऑफ राथ' या कादंबरीतून आपल्यालाही बसले. मृत्युदंडाची शिक्षा झालेली असताना शेवटल्या क्षणी ती रद्द झाल्यामुळे डोस्टोव्हस्कीनं जवळपास मृत्यूचं बघितला होता. अशी अनेक उदाहरणं पाश्चिमात्य, हिंदी आणि मराठी साहित्यातलीसुद्धा सांगता येतील. त्यांचं साहित्य कालबाह्य ठरलं नाही. कारण एक तर मुळात ते खूपच संवेदनशील आणि प्रतिभावान होते हे जितकं खरं, तितकंच त्यांनी जीवन खूप जवळून अनुभवलं तरी होतं किंवा निदान वाचनानं किंवा निरीक्षणानं त्यांच्या कक्षा रुंदावल्या होत्या हेही तितकंच खरं होतं.

या दोन तऱ्हांनी आपल्या जाणिवांच्या कक्षा रुंदावण्याबाबत एक ऐकलेली गोष्ट मला आठवते. एकदा कोणीतरी ना. सी. फडके यांना 'तुम्ही फक्त प्रेमावरच लिहिता, अण्णा भाऊ साठे बघा, कामगारांच्या वेगवेगळ्या अनुभवविश्वाबद्दल लिहितात,' असं म्हटलं. त्यावेळी फडक्यांनासुद्धा कामगारविश्वाविषयी अनुभव घेण्याची इच्छा निर्माण झाली. त्यांनी लगेच डांग्यांना गाठून आपली इच्छा सांगितली. त्याच सुमारास कामगारांचा एक मोर्चा मंत्रालयावर जाऊन थडकणार होता. डांग्यांनी लगेच फडक्यांना त्याचा अनुभव घेऊन त्यावर लिहायला सांगितलं. फडक्यांनी लगेच टॅक्सी बुक करून मोर्चा चालू असताना टॅक्सीतून जोषात चाललेला तो मोर्चा न्याहाळणं सुरू केलं. ते त्यावेळी मनातल्या मनात त्या मोर्चाविषयीची टिपणं काढत होते. तो मोर्चा बघत असताना अचानक त्यांनी नजर एका ट्रककडे गेली. त्या ट्रकच्या बॉनेटवर अण्णा भाऊ साठे देहभान विसरून जोरजोरात घोषणा देत होते. तल्लीन होऊन पोवाडे म्हणत होते. थोडक्यात, मोर्चा तोच, वास्तव तेच. पण त्याकडे बघण्याच्या आणि ते अनुभवण्याच्या दोन वेगळ्या तऱ्हा होत्या. पद्धती वेगवेगळ्या असल्या तरीही निदान दोघांनी कामगार मोर्चाचा अनुभव तरी घेतला होता.

केशवसुत, मर्ढेकर, करंदीकर, कुसुमाग्रज, सुर्वे



अनुक्रमणिका

अशा कवींच्या कवितांची नाळ समाजातल्या वास्तवाशी जोडलेली होती. केशवसुतांची लहानपणी शिकलेली 'नवा शिपाई' ही कविता आजही तरुणांसाठी लागू आहे.

*'ब्राह्मण नाही, हिंदूही नाही, न मी एक पंथाचा*
*तेच पतित की जे आखडती प्रदेश साकल्याचा*
*खादाड असे माझी भूक, चतकोराने मला न सुख*
*कुपातील मी नच मंडुक,*
*मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदी मला न साहे*
*नव्या मनुतील नव्या दमाचा शूर शिपाई आहे'*

धर्मनिरपेक्षता, 'थिंकिंग बिग' आणि मानवतावाद यांचं यापेक्षा सुंदर उदाहरण कुठलं असेल? 'पिपात मेले ओल्या उंदीर' असं काव्य लिहिणारे आणि युद्धावर कठोर टीका करणारे मर्ढेकरही वास्तवाला आणि जीवनाला भिडले होते. म्हणूनच त्यांचं काव्य अजरामर झालं. चंगळवादाच्या अतिआहारी जाऊन संवेदनशील माणसाला स्वत:च्या रूपाबद्दलच संभ्रम पडावा अशी आज स्थिती आहे असं व्यक्त करताना विंदा करंदीकर म्हणतात :

*'देशी विदेशी वस्तूंनी भरली घराची दालने*
*मजलाच ना जागा उरे, हे सोंग माझे कोठले'*

नारायण सुर्वे भाकरीत आपला चंद्र शोधताना म्हणतात,

*'भरल्या पोटी अगा जर पाहतो चंद्र,*
*आम्हीही कोणाची याद केली असती'*

अशी मराठी साहित्यात अनेक उदाहरणं आहेत.

दलित साहित्याला सुरुवातीला अतिशय खडतर मार्गानं जावं लागलं. 'हे साहित्यच नाही' अशी त्याची उपेक्षा केली गेली. आपल्यातल्या मध्यमवर्गीय वृत्तीची गंमत बघा, जेव्हा दया पवारांचं 'बलुतं' आलं तेव्हाही सुरुवातीला अनेकांनी ते वाचून नाकं मुरडली होती. पण त्यानंतर एक गंमत घडली. पु. ल. देशपांडे यांनी 'बलुतं' वाचलं आणि त्यानं ते भारावून गेले. त्यांनी 'बलुतं'ला 'दु:खानं गदगदलेलं झाड' असं म्हटलं. ते असंही म्हणाले, 'आम्ही दूरदूरची दु:खं पाहिली पण माझ्या हाकेच्या अंतरावर जे एक जग आहे ते मी बघितलंच नव्हतं. मला या जगाचा पत्ताच नव्हता. बलुतंनं मला हे जग दाखवलं.' पु. ल. देशपांडेंच्या या भावस्पर्शी प्रतिक्रियेनंतर मध्यमवर्गानं 'बलुतं' उचलून धरलं आणि आठवडाभरातच बलुतंच्या १००० प्रती विकल्या गेल्या!

त्यानंतरच्या पिढीतले त्यांचे वारसदार म्हणून लक्ष्मण माने, दया पवार, नामदेव ढसाळ, अरुण कांबळे, अरुण कोलाटकर, दिलीप चित्रे, प्रकाश संत, वसंत आबाजी डहाके, भालचंद्र नेमाडे, सतीश काळसेकर, विश्वास पाटील, उत्तम कांबळे अशा अनेकांनी आपली जबाबदारी समर्थपणे पेलली.

त्यानंतरही आलेली पिढी म्हणजे रंगनाथ पाठारे, राजन गवस, राजन खान, मिलिंद बोकील, सदानंद देशमुख, जयंत पवार यांनी आपल्या लिखाणातून वाचकांना सतत सजग केलं. शफाअत खानचं 'शोभायात्रा' असो वा संजय पवारचं 'कोण म्हणतं टक्का दिला' असो, या नाट्य-साहित्यातून वाचक अंतर्मुख झाला. 'बेरड'सारखं साहित्य भीमराव गस्तींसारख्या कार्यकर्त्याच्या अनुभवातून जन्मलं.

लक्ष्मीबाई टिळक यांच्यापासून कमल देसाई, गौरी देशपांडे, अरुणा ढेरे, सानिया, नीरजा, प्रज्ञा लोखंडे, उर्मिला पवार, मेघना पेठे, कविता महाजन आणि यशोधरा गायकवाडपर्यंतच्या लेखिकांनी चौकटीच्या बाहेर जाऊन एक स्वतंत्र वाट शोधली आणि साहित्यात एक नवा पायंडा पाडला. गिरीश जोशी, प्रशांत दळवी, मनस्विनी लता रविंद्र हे नव्या दमाचे नाटककार समाजाचं वास्तव दाखवत दोन पावलं पुढे नेण्याचं काम करत आहेत.

अनेक तरुण साहित्यिक आपले पाय आज साहित्याच्या भूमीत रोवू पाहताहेत. कोकणातल्या सावंतवाडीचा 'चाळगत' कादंबरीचा लेखक प्रवीण





अनुक्रमणिका

दशरथ बांदेकर याची लेखणी सशक्तपणे कोकणचं वास्तववादी दर्शन या कादंबरीतून करते आहे, तर बालाजी मदन इंगळे या तरुणानं 'झिम पोरी झिम' या कादंबरीतून ग्रामीण भागातल्या स्त्रीचं चित्र चितारलं आहे. तसंच नांदेडचा मनोज बोरगावकर याचा 'कोरा कागद निळी शाई' नावाचा उत्कृष्ट काव्यसंग्रह आहे. मराठवाड्यातल्या परभणीचा केशव खटिंग, संतोष नारायणकर, मुखेडचा दीपक अंगेवार, जालन्याचा विजय आव्हाड, अकोल्याचा किशोर बळी, औरंगाबादचा अभय दाणी, प्रणव प्रियांका प्रकाश, उत्पल चंदावार हेही नव्या दमाचे कवी आणि गझलकार आहेत. याशिवाय कोकणातले अनिल ढाकू कांबळी, अजय कांडर आणि वीरधवल परब, विदर्भातले इशादास भडके, लोकनाथ यशवंत आणि अशोक पवार, पश्चिम महाराष्ट्रातले धम्मपाल रत्नाकर आणि रफिक सूरज़, मराठवाड्यातला एकनाथ आव्हाड अशांसारख्या अनेकांनी उत्तमोत्तम लेखन करून नवे रस्ते शोधले आहेत.

विद्यापीठाचं तोंडही न बघितलेले यातले काही तरुण आहेत. यातले काही पोस्टर्स रंगवताहेत तर काही जण शेतावर राबताहेत. त्यांच्या कष्टमय जगण्यातही त्यांच्यातला आशावाद अजून जिवंत आहे. म्हणूनच मुखेडचा दीपक अंगेवार म्हणतो,

*'लाख दु:खे भोवताली, दु:ख आपुले मग बघू*
*येऊ दे हृदयात त्यांना, कोण कुठले मग बघू'*

केशवसुतांच्या उन्नत, उदात्त विचारांचं तण अजूनही या मातीत जिवंत आहे हेच यावरून दिसतं.

सगळेच फोनवर बोलतायत, सगळीच गर्दी एकटी आहे अशी खंत व्यक्त करणाऱ्या औरंगाबादच्या वैभव देशमुख याला हे शहर कसं अस्वस्थ करतं ते पाहा :

*'प्रेम करणाऱ्या पण लग्नाला नकार देणाऱ्या प्रेयसीसारखं हे शहर...*
*सारं दिलं पण रुजू दिली नाहीत घराची मुळं या जमिनीत*
*एकदा ठेच लागली अचानक,*
*तर गावाच्या मातीचा वास आला रक्तातून*
*वाटलं धावत सुटावं सुसाट सारे सिग्नल तोडत गावाच्या रस्त्यानं*
*पण कुठं घराच्या मुळाची जागाच हरवली गावातून*
*आणि इथे रुजण्याच्या प्रयत्नात तर मूळच हरवत चाललंय घर*
*प्रेम करणाऱ्या पण लग्नाला नकार देणाऱ्या प्रेयसीसारखं हे शहर...*

अशा वेगवान जीवनात आपण कसे हरवून जात आहोत याचं एक बोलकं उदाहरण नुकत्याच एका वाचलेल्या कवितेतल्या ओळींमधून व्यक्त झालंय. त्या कवितेत वेगवान शहरीकरणात काय काय घडू शकतं याविषयी सांगताना कवी म्हणतो, 'पाळणाघरातून आपलं मूल परत नेताना चुकून दुसऱ्याचंच मूल ती आई घरी घेऊन जाते असं पाळणाघराची संचालिका दुसऱ्या दिवशी तिला सांगते. ती हेही सांगते की, असं झाल्यानं काही बिघडलं नाही कारण जिचं मूल चुकून नेलं गेलं तिच्याही ते लक्षात आलेलंच नाहीये.' या गतीच्या चक्रात मनही यंत्रवत होतंय असं वाटणारी भावना कवीनं अचूकपणे टिपलीय.

आज प्रकाशक काव्यसंग्रह काढण्याबाबत उदासीन दिसत असतानाही हे तरुण कवी मित्र तितक्याच सशक्तपणे आपल्याला त्यांच्या काव्यातून वास्तवाचा जिवंत अनुभव देत आहेत आणि मनाची तडफड, उद्विग्नता मोजक्या शब्दांत मांडताहेत. अशा युवांना व्यासपीठ मिळालं पाहिजे. अन्यथा आजच्या प्रकाशनाच्या अर्थकारणामुळे असे शेकडो लेखक अव्यक्त राहतील आणि तसं झालं तर नवा सुर्वे आपल्याकडे निर्माण होईल कसा? आपण त्यांच्यातला आणि समाजामधला पूलच तर तोडत नाही आहोत ना, असा प्रश्न आपल्याला पडल्याशिवाय राहणार नाही.

आजच्या तरुणांमध्ये 'सोशल नेटवर्किंग' हा

खूपच लोकप्रिय प्रकार आहे. फक्त ट्विटर या 'सोशल नेटवर्किंग'ची सुविधा पुरवणाऱ्या वेबसाईटच्या सभासदांमध्ये २००९ साली तब्बल १३८२% एवढी प्रचंड वाढ झाली! सर्व जगामधल्या गेल्या दोन वर्षांतल्या स्थित्यंतरामध्ये आणि चळवळींमध्ये सोशल नेटवर्किंगचा खूप मोठा सहभाग आहे. अमेरिकेत सुरू असलेली आणि आता ८५ देशांत पसरलेली 'ऑक्युपाय वॉलस्ट्रीट मूव्हमेंट' असो किंवा युरोपमधल्या सरकारी कल्याणकारी खर्चकपातीविरुद्धच्या चळवळी असोत, हुकूमशाहीविरुद्धची अनेक देशांत पसरलेली 'अरब स्प्रिंग' चळवळ असो किंवा आपल्याकडली भ्रष्टाचाराविरुद्धची अण्णा हजारेंची चळवळ असो, या सगळ्यांमध्ये तरुणांनी खूप मोठ्या संख्येनं सोशल नेटवर्किंगचा वापर करून या चळवळी उत्स्फूर्तपणे उभ्या केल्या. या चळवळींतली उद्दिष्टं किंवा त्यांचे मार्ग हे बरोबर का चूक हा वेगळा मुद्दा. तसंच यातल्या बऱ्याचशा चळवळींना ठोस वैचारिक बैठक आणि नेतृत्व नसल्यामुळे त्यांना अराजकतेचा एक वास येत होता, हाही भाग वेगळा. पण असं असलं तरी यातून एक गोष्ट मात्र स्पष्ट होते, ती म्हणजे आजचा तरुण हा जागा होतोय. आता तो आपलं म्हणणं स्पष्टपणे आणि ठामपणे मांडायला लागलाय आणि मुख्य म्हणजे त्याचा जागतिक राजकारणावर मोठा परिणाम घडून येतोय.

भारतात इंटरनेट आणि सोशल मीडिया वापरणाऱ्यांचं प्रमाण भराभर वाढतंय. डिसेंबर २०११ अखेर १२ कोटी म्हणजे लोकसंख्येच्या १०% भारतीय लोक ऑनलाईन असतील. हे प्रमाण वाढत जाऊन २०२० पर्यंत भारत हा सर्वाधिक इंटरनेट युजर्सचा देश बनेल असा एक अंदाज आहे. भारतात इंटरनेट वापरणाऱ्या लोकांपैकी २७% लोक तरुण आहेत. नुकत्याच केलेल्या पाहणीत १८ वर्षांखालील मुलांमध्ये इंटरनेट वापरण्याचं प्रमाण वाढतंय असं दिसून आलं. पण ही पिढी फक्त चॅटिंग, फोटोंची देवाणघेवाण यांसाठीच त्याचा वापर जास्त करते. इंटरनेट वापरणाऱ्यांचं प्रमाण ग्रामीण, निमशहरी भागातही वाढतंय ही चांगली गोष्ट आहे. तिथे इंग्रजी येणारे लोक कमी असल्यामुळे भारतीय भाषांत इंटरनेटवर साहित्य, सुविधा उपलब्ध होण्याची गरज आहे. युनिकोडच्या सुविधेमुळे आता हेही शक्य होत आहे. शहरातली ६४% तर ग्रामीण भागातली २७% मुलंच शिक्षणासाठी इंटरनेट वापरतात. बाकी सर्वजण चॅटिंग आणि तत्सम गोष्टींसाठीच सोशल नेटवर्किंग वापरतात. हे चॅटिंग, एकमेकांशी त्या निमित्तानं संपर्क साधणं हे उत्तमच आहे. पण तरीही 'सोशल नेटवर्किंग'च्या तंत्रज्ञानाच्या ताकदीचा वापर योग्य मार्गांनी करणं ही तरुणांची एक मोठीच जबाबदारी आहे.

साहित्याच्या बाबतीत इंटरनेटचे बरेच फायदे आहेत. ॲमेझॉन, फ्लिपकार्ट, बुकगंगा अशा वेबसाईट्सवरून ऑनलाईन पुस्तकं खरेदी करणं शक्य होतं. त्यावर निरनिराळे ई-बुक रीडर्स असल्यामुळे पुस्तकं ऑनलाईन वाचताही येतात. इंटरनेटच्या तंत्रज्ञानामुळे लिहिणं आणि वाचणं खूपच सोपं झालंय. शिवाय इंटरनेटमुळे लिहिलेलं साहित्य आपण आपल्या मित्रांना, आप्तांना आणि वाचकांना वाचायला देणं– थोडक्यात त्याचं वितरण करणं– खूपच सोयिस्कर आणि स्वस्त झालंय. या नव्या तंत्रामुळे आपणच आता लेखक आणि प्रकाशक असे दोन्ही बनू शकतो, या विचारानं अनेक लेखक पुढे येऊ शकतील. पण त्यासाठी कम्प्युटर स्वस्त होऊन सगळ्यांना परवडावे तर लागतीलच, पण कम्प्युटर शिक्षणाचा प्रसारही झाला पाहिजे.

इंटरनेटवर तरुणांच्या लिखाणाचा एक प्रकार म्हणजे ब्लॉगविश्व. मराठीतही अनेकजण ब्लॉग्ज लिहितात. या ब्लॉग्जवर कविता, ललितलेखन, कथा, चित्रपट समीक्षा, संगीतावरचे लेख, छायाचित्रांसह प्रवासवर्णनं अशा गोष्टी मोठ्या प्रमाणावर आढळतात. 'लिहिणं ही समस्या नाहीये... तर तुम्हाला जे पटतं

ते लिहिणं ही समस्या आहे,' असं रॉबर्ट लुईस स्टीव्हनसनचं वाक्य आहे. त्याप्रमाणे स्वत:ला पटणारी वेगळी वाट शोधून चाकोरीबाहेरचे विषय हाताळणारे युवाही आहेत. त्यामुळेच तर ऊर्जा, प्रदूषण, पर्यावरण, माहितीचा अधिकार, आजच्या ग्रामीण भागातल्या समस्या आणि आजचं वास्तव यांसारखे वेगळे विषयही काही तरुणांनी आपल्या ब्लॉग्जमधून हाताळलेले दिसतात. पत्रकारितेच्याबाबत तर ज्या पत्रकारांना संधी मिळत नाही, व्यासपीठ नाही असे पत्रकार ताज्या आणि ज्वलंत प्रश्नांवर खास पत्रकारांसाठी खुल्या असलेल्या ब्लॉग्जवर कुठूनही लिहू शकतात. अर्थात हे प्रमाण खूपच कमी असलं तरी त्याचा प्रचार आणि प्रसार करायला हवा.

पण आपण एक गोष्ट मात्र लक्षात ठेवली पाहिजे. कुठल्याही तंत्रज्ञानामुळे साहित्याचा वाङ्मयीन दर्जा वाढत नाही. एखादी कविता किंवा कथा बोरू, टाक, फाउंटन पेन, बॉल पेन, पेन्सिल किंवा कम्प्युटरचा की-बोर्ड यांच्यापैकी कशाचाही वापर करून निर्माण केली असली तरी त्या लेखनाचा दर्जा त्या कवितेतल्या किंवा कथेतल्या आशयावरच अवलंबून असतो. ते लिखाण जीवनाला किती भिडतंय यावरच त्याची साहित्यमूल्यं ठरतात; ते लिहिताना वापरलेल्या तंत्रज्ञानामुळे नव्हेत. त्यामुळे सकस, सामाजिक भान असलेलं आणि सुंदर साहित्य निर्माण व्हायला हवं असेल तर मानवतावादी मूल्यं, समानता, धर्मनिरपेक्षता, सहिष्णुता, एकमेकांबद्दल आत्मानुभव (एम्पथी), पर्यावरणाचे प्रश्न, पर्यायी विकासनीती या सगळ्यांविषयी विचार करणारा आणि ते अंमलात आणणारा तरुणवर्ग निर्माण व्हायला हवा. तरुणांमधला सळसळता उत्साह, कौशल्यं यांना वाट मिळायला हवी. समृद्धी, न्याय आणि समता असलेलं जग निर्माण व्हायला हवं. तसं झालं तरच त्याचं प्रतिबिंब साहित्यातही उमटेल. विज्ञाननिष्ठ, सामाजिक भान असणारे सजग आणि निर्भय युवा असतील तर त्याचा साहित्यावरही चांगलाच परिणाम दिसू शकेल.

खरं तर यौवन म्हणजे सळसळता उत्साह, जागेपणी स्वप्नं पाहणं आणि ती साकार करण्यासाठी धडपडणं. त्यानं आणि तिनं प्रेमात पडणं, धाडस, मन:पूर्वकता, गगनाला गवसणी घालण्याची आकांक्षा बाळगणं असं सगळं, पण त्याचबरोबर आज युवांना आयुष्यात जीवघेणी स्पर्धा, संघर्ष, ताण, अस्थिरता यांना सामोरं जावं लागतं आहे.

साहित्य समाजमनाचा आरसा असून त्याची धुरा आजच्या युवांनीच सशक्तपणे खांद्यावर घ्यायला हवी. माध्यम कुठलंही असो, साहित्यानं समाज बदलाची ताकद युवा साहित्यात निर्माण झाली तर खऱ्या अर्थानं युवा साहित्य-नाट्य संमेलनाचा हेतू साध्य झाला असं म्हणता येईल! धन्यवाद!

◊◊◊

**अच्युत गोडबोले**
achyut.godbole@gmail.com
www.achyutgodbole.com

---

## १ एप्रिल २०१०पासूनचे आजीव सभासद

४६) भिडे उदय विनायक, ठाणे
४७) केसरकर अशोक, इचलकरंजी
४८) कुलकर्णी प्रशांत सुभाष, अंबरनाथ
४९) जुवेकर अनुराधा, अंबरनाथ
५०) केळूसकर गणेश, अंबरनाथ
५१) पेंढारकर श्रीराम नारायण, अंबरनाथ
५२) पेंढारकर सुप्रीया श्रीराम, अंबरनाथ
५३) नवगिरे संदीपान श्रीमंत, अंबरनाथ
५४) निचिते संजय तुकाराम, अंबरनाथ
५५) देसाई जगताप रूपा, अंबरनाथ
५६) पाटील दिगंबर दगडु, जामनेर
५७) शिंदे जयवंत रामचंद्र, मोशी
५८) सोनगे कमल उत्तमराव, चिंचवड
५९) गुंजोटे नंदकिशोर, चिंचवड
६०) गावडे गणेश सखाराम, तलावडे
६१) तापकीर राजेन्द्र अप्पा, दिघी
६२) वेसणेकर विनोद, आकुर्डी
६३) सोनवणे महेश श्यामसुंदर, निगडी



अनुक्रमणिका

# डॉ. रा. शं. वाळिंबे
# यांनी केलेली गडकऱ्यांच्या नाटकांची समीक्षा

- डॉ. विनायक गंधे

*डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने लिहिलेला हा लेख म्हणजे १९५० ते १९७० ह्या दोन दशकांमधील मराठी-समीक्षेचा एक मापदंड आहे. डॉ. रा. शं. वाळिंबे म्हणजे पाश्चात्य आणि भारतीय समीक्षा वैशिष्ट्यांचा सुरेख संगम होता. नाटककार राम गणेश गडकरी यांच्यावरील संशोधक-समीक्षालेखन हा त्यांच्या समीक्षालेखनातील एक लक्षणीय भाग आहे. आजही तो मार्गदर्शक आहे. डॉ. वाळिंबे यांच्या ध्यास आणि अभ्यासाचा तो विषय होता. गडकऱ्यांची बहुतेक नाटके त्यांना मुखोद्गत होती. एखाद्या कसलेल्या नटाच्या सामर्थ्याने, आपल्या व्याख्यानातून, ते शब्दप्रभू गडकऱ्यांच्या नाटकातील स्वगतांचा प्रभावी नाट्याविष्कार घडवीत; आणि तितक्याच अभ्यास-सामर्थ्याने समीक्षा करीत असत. ह्या लेखात एकाच वेळी, प्रतिभासंपन्न गडकऱ्यांच्या नाट्यलेखनाचा आणि डॉ. वाळिंबे ह्यांच्या समीक्षालेखनाचा घेतलेला आढावा वाचनीय आहे. नव्या अभ्यासकांना मार्गदर्शक आहे.*
*डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांचे हे पुनर्दर्शन.* *– संपादक*

डॉ. रा. शं. वाळिंबे हे दोन पिढ्यांपूर्वीचे मराठीचे एक नामवंत प्राध्यापक होते. अर्धशतकापूर्वीच्या महाराष्ट्रातील अत्यंत व्यासंगी आणि उद्यमशील प्राध्यापकवर्गाचे ते प्रतिनिधी होते, असे म्हणावयास हरकत नाही. मराठीचे प्राध्यापक असून त्यांचा इंग्रजी आणि संस्कृत साहित्याचा आणि साहित्यशास्त्राचा दांडगा व्यासंग होता. संस्कृत साहित्यशास्त्राचे आणि पाश्चात्त्य साहित्यशास्त्रांचे ते चांगले जाणकार होते. संस्कृत साहित्यशास्त्रातील सिद्धान्तांची त्यांनी मराठी साहित्याच्या अभ्यासकांना ओळख करून दिली. तसेच तत्कालीन पाश्चिमात्य साहित्यविचारांचाही त्यांनी परिचय करून दिला. याबरोबरच डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या कार्याचा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे ते राम गणेश गडकरी यांच्या वाङ्मयाचे एक महत्त्वाचे अभ्यासक होते. राम गणेशांचे वाङ्मय हा त्यांचा आयुष्यभरचा ध्यास होता. जवळ जवळ चाळीस-पंचेचाळीस वर्षे त्यांनी गडकरी वाङ्मयावर लिहिले; आणि व्याख्याने दिली. १९४६ पासून १९८७ पर्यंत ते सातत्याने गडकरीवाङ्मयाची समीक्षा करीत राहिले. गडकरी जन्मशताब्दीच्या वर्षी, १९८५ मध्ये वयाची सत्तरी ओलांडल्यानंतरही त्यांनी गडकरीवाङ्मयावर महाराष्ट्रात विविध ठिकाणी एकोणतीस व्याख्याने दिली. गडकरीवाङ्मयावर त्यांनी आयुष्यभर मनापासून प्रेम केले आणि गडकरीसाहित्याचे गुणसंकीर्तन अखेरपर्यंत केले.

गडकऱ्यांच्या नाटकांवर आणि काव्यावर त्यांनी चाळीस वर्षांच्या कालखंडात चार ग्रंथ लिहिले. १) सुधाकर की एकच प्याला (१९४६) २) गडकऱ्यांचे अंतरंग (१९५१) ३) नाटककार गडकरी (१९५७) ४) गडकरी संघर्ष आणि व्यथा या ग्रंथांतून त्यांनी गडकऱ्यांच्या नाटकांचा आणि काव्याचा परामर्श घेतला.

## संशोधक डॉ. वाळिंबे

गडकरीवाङ्मयाच्या सर्वांगीण परामर्शात त्यांची संशोधक आणि समीक्षक ही दोन रूपे प्रकट झाली आहेत. गडकरीवाङ्मयाचे संशोधक म्हणून त्यांची कामगिरी अत्यंत मोलाची आहे. डॉ. वाळिंबे यांनी गडकऱ्यांच्या सर्व-नाटकांची मूळ हस्तलिखिते त्यांच्या वारसांकडून तसेच नाट्यक्षेत्रातील व्यक्तींकडून मोठ्या परिश्रमाने मिळविली. तसेच गडकऱ्यांच्या काळातील नाट्यक्षेत्रासंबंधीची काही अस्सल कागदपत्रंही त्यांनी



अनुक्रमणिका

प्रयत्नपूर्वक मिळविली. त्यांचे जतन करून आपल्या नाट्यसमीक्षेत त्यांचा उपयोग केला. यासंदर्भात गडकऱ्यांच्या 'गर्वनिर्वाण' नाटकाची कथा सांगण्यासारखी आहे. 'गर्वनिर्वाण' हे गडकऱ्यांचे पहिले नाटक. गहाळ झालेले हे नाटक मोठ्या परिश्रमपूर्वक संशोधून डॉ. वाळिंबे यांनी सिद्ध केले. 'गर्वनिर्वाण' नाटकाच्या सिद्धतेत डॉ. वाळिंबे यांचे दीर्घ परिश्रम आणि चिकाटी आहे.

गडकरी नाटककार म्हणून प्रकाशात येण्याआधी १९०८ पासून 'गर्वनिर्वाण' नाटक लिहीत होते. हे प्रल्हादचरित्रावरील नाटक १९०८ पासून गडकरी अधूनमधून लिहीत. आधीपासून लिहायला सुरुवात करून ते काही पूर्ण होत नव्हते. या नाटकाबद्दल वदंता आणि आख्यायिका खूप होत्या. त्यातील एक वदंता अशी की, राजद्रोहाचा आरोप होऊ नये म्हणून घाबरून गडकऱ्यांनी या नाटकाचा काही भाग जाळला. असे म्हणतात की, काही काळानंतर गडकऱ्यांनी हे नाटक पुन्हा लिहून काढले. या नाटकाच्या हस्तलिखिताचा काही भाग गडकऱ्यांच्या मृत्यूनंतर सहा-सात वर्षांनी प्रसिद्ध झाला. या नाटकाच्या हस्तलिखिताची विस्कळित स्वरूपातील पाने, गडकऱ्यांनी वेळोवेळी परिष्करण व पुनर्लेखन केलेली काही पाने डॉ. वाळिंबे यांनी परिश्रमपूर्वक मिळविली. 'गर्वनिर्वाण'ची जीर्णशीर्ण पाने जतन करून ठेवली. १९६२ साली पुण्याला आलेल्या पानशेतच्या पुरात भिजलेली, चिखलात रुतलेली ही पाने वाळवून डॉ. वाळिंबे यांनी त्यांचा क्रम लावला, जीर्ण पानांवरील पुसट झालेला मजकूर लावला, अक्षरे लावली. या दीर्घोद्योगातून गडकऱ्यांचे 'गर्वनिर्वाण' हे नाटक सिद्ध झाले. गडकरी जन्मशताब्दीच्या वर्षी हे नाटक प्रसिद्ध झाले. इतकेच नव्हे, तर आजवर या नाटकाचा प्रयोग झाला नव्हता, तो गडकरी जन्मशताब्दीच्या वर्षी झाला. 'लीळाचरित्र' लिहिताना माहिमभट्टाने 'श्रीमुखीचे शब्द' जसे पारखून घेतले, तसेच डॉ. वाळिंबे यांनी गडकऱ्यांचे शब्द पारखून घेऊन 'गर्वनिर्वाण'ची संहिता सिद्ध केली. संशोधक, संकलक आणि संपादक या तिन्ही भूमिका त्यांनी निष्ठेने पार पाडल्या.

प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, भावबंधन, राजसंन्यास आणि एकच प्याला या नाटकांची मूळ हस्तलिखिते, तत्कालीन नाट्यव्यवहारातील अस्सल कागदपत्रं उपलब्ध करून डॉ. वाळिंबे यांनी नाट्याभ्यासकांना उपकृत करून ठेवले आहे. या हस्तलिखितांच्या आधारे डॉ. वाळिंबे यांनी त्या त्या नाटकाचा लेखनकाल, नाट्यलेखनाचा क्रम, रचना, नाट्यलेखनाचे स्थल, नाटकाचा पहिला प्रयोग इ. गोष्टींची मौलिक माहिती दिली आहे. गडकऱ्यांच्या काही नाटकांची परिष्करणेही त्यांनी सादर केली आहेत. नाटककार म्हणून गडकऱ्यांचा अभ्यास करताना ती खूप उपयुक्त ठरणारी आहेत.

'प्रेमसंन्यास' हे गडकऱ्यांचे पहिले महत्त्वाचे नाटक गडकऱ्यांनी प्रथम सुखान्त केले होते. परिष्करण करून नंतर ते दुःखान्त झाले. नाटकाचा शेवट दुःखपूर्ण करावा असे नंतर ठरले. म्हणून गडकऱ्यांनी 'संधिसाधन' किंवा 'मनोरथांचा धूर' ही नाटकाची पहिली नावे बदलून 'प्रेमसंन्यास' हे नाटकाचे नाव पक्के केले असावे, असे डॉ. वाळिंबे यांना वाटते. डॉ. वाळिंबे यांच्या म्हणण्यानुसार, मुळातील हस्तलिखितात जयंत व लीला यांच्या पुनर्विवाहाची घटना असून शेवट आनंदी आहे. मुळात सुखान्त असलेले नाटक गडकऱ्यांनी दुःखान्त केले, याचा नाट्याभ्यासकांनी अभ्यास करण्यासारखा आहे.

'एकच प्याला' या गडकऱ्यांच्या महत्त्वाच्या नाटकाच्या संदर्भात डॉ. वाळिंबे यांनी या नाटकाच्या हस्तलिखिताच्या आधारे मौलिक माहिती उपलब्ध करून दिली आहे. अस्सल कागदपत्रांच्या आणि अधिकृत पुराव्याच्या आधारे डॉ. वाळिंबे यांनी 'एकच प्याला' नाटकाची जन्मकथा सांगितली आहे. हे नाटक कोणत्या घटनेवरून सुचले, ती घटना पुणे





शहरात कशी घडलेली होती, याची समग्र माहिती डॉ. वाळिंबे देतात. तसेच या नाटकाची अंकवार रचना कशी झाली व सात महिने तेरा दिवसांत गडकऱ्यांनी कोणत्या क्रमाने हे नाटक लिहिले, हे डॉ. वाळिंबे यांनी अस्सल पुराव्यासह दाखवून दिले आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार 'एकच प्याला'च्या पाच अंकांचे लेखन ५, ४, २, १, ३ अशा क्रमाने झाले आहे. तिसरा अंक संपल्यानंतर गडकऱ्यांनी नाट्यलेखन समाप्तीची तारीख घातली आहे. या मौलिक माहितीच्या आधारे 'एकच प्याला' नाटकाच्या रचनेवर प्रकाश पडतो. गडकऱ्यांच्या मनात या नाटकाचा शेवट पक्का होता व तो त्यांनी आधीच लिहिला, हे लक्षात येते. नाट्यरचनेत दोष का आले असावेत, याची यामुळे कारणमीमांसा करता येते. त्यामुळेच भावी गडकरी अभ्यासकांना डॉ. वाळिंबे यांनी मिळविलेली व जतन करून ठेवलेली गडकऱ्यांच्या नाटकांची हस्तलिखिते, हा एक अमोल ठेवा आहे.

### डॉ. वाळिंबेपूर्व काळातील गडकरी नाट्यसमीक्षा

डॉ. वाळिंबे यांचा 'नाटककार गडकरी' हा ग्रंथ १९५७ मध्ये प्रकाशित झाला. त्यापूर्वी गडकऱ्यांच्या नाटकांवर स्वतंत्र ग्रंथरूपाने लेखन झालेले आहे. गडकऱ्यांचे निधन १९१९ मध्ये झाले. त्यावेळी 'एकच प्याला' आणि 'भावबंधन' ही त्यांची नाटके विलक्षण लोकप्रिय होऊ लागली होती. गडकऱ्यांच्या निधनानंतर पाचच वर्षांनी जोशी-साठे या लेखकद्वयाचे 'महाराष्ट्रीय नाटककार गडकरी' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. किर्लोस्कर, देवल किंवा खाडिलकर या नाटककारांच्या नाट्यकृतींचे विवेचन करण्यापेक्षा गडकऱ्यांच्या नाटकांच्या लोकप्रियतेचा शोध घेणे त्यांना अगत्याचे वाटले. प्रा. ना. सी. फडके (टाकीचे घाव– किर्लोस्कर, देवल, गडकरी), वि. स. खांडेकर (गडकरी व्यक्ती व वाङ्मय), शं. ना. सहस्रबुद्धे (नाट्यस्वरूप गडकरी) हे डॉ. वाळिंबेपूर्व महत्त्वाचे गडकरी समीक्षक होत. फडके, खांडेकर हे त्या काळातील मराठी साहित्यातील लोकप्रिय होऊ पाहाणारे ललितलेखक होते. वि. स. खांडेकरांचा 'गडकरी : व्यक्ती व वाङ्मय' हा गडकरी वाङ्मयाचे विवरण करणारा पहिला मोठा प्रबंध होय. फडके आणि खांडेकर हे दोघेही गडकऱ्यांच्या लोकप्रियतेचे रहस्य शोधण्याच्या भूमिकेतून त्यांच्या नाटकांवर लिहायला प्रवृत्त झालेले दिसतात. या दोघांनीही गडकऱ्यांच्या नाटकांची जी समीक्षा केली ती वरवरची व तपशीलाला महत्त्व देणारी आहे. या समीक्षेतून त्यांच्या कलावादाचा व जीवनवादाचा येणारा प्रत्यय अत्यंत जुजबी स्वरूपाचा आहे. 'नाटक' या वाङ्मयप्रकाराच्या पृथगात्मतेचे त्यांचे आकलन फारसे खोल नाही. खांडेकर व फडके या दोघांनीही श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या नाटकांचे विशेष लक्षात घेऊन त्याआधारे गडकऱ्यांच्या नाटकांची पाहणी केली. खांडेकरांनी नाटकाच्या तंत्राला आणि रचनेला अधिक महत्त्व दिले. फडके यांनी कलाकृतीत काय सांगितले, यापेक्षा कसे सांगितले हा प्रश्न महत्त्वाचा मानला. या दोघांनी विविध नाट्यांगांचा एकत्रित विचार न करता सुटा-सुटा केला.

प्रेमसंन्यास, एकच प्याला किंवा राजसंन्यास या नाटकांचा दु:खपर्यवसायी नाटक म्हणून विचार करताना शोकांतिकेच्या संदर्भात या नाटकांची मीमांसा करावी, असे त्यांना वाटले नाही. गडकऱ्यांनी शोकरसाचे हत्यार वापरले ते प्रेक्षकांना स्तिमित करण्यासाठीच, ही गडकऱ्यांच्या लेखनगुणांची फडकेप्रणित मीमांसा उथळ स्वरूपाची आहे. प्रसंगाचा अघटितपणा व स्वभाववैशिष्ट्यांचे अतिरंजन या दोन गोष्टींमुळे गडकऱ्यांना यश मिळाले, असा ना. सी. फडके यांचा निष्कर्ष आहे. "नाटककार या नात्याने गडकरी सर्वांत निकृष्ट होते, पण भाषेची उपासना आणि तपश्चर्या करणारे प्रतिभासंपन्न लेखक म्हणून मात्र ते या चौघांत (किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, कोल्हटकर) श्रेष्ठ ठरतील."[१] असाही फडके यांनी निर्णय दिला



अनुक्रमणिका

आहे. फडके आणि खांडेकर या दोघांनीही गडकऱ्यांच्या नाटकांवर घेतलेले आक्षेप आणि शंका पाहिल्या की लोकधर्मी आणि नाट्यधर्मी यांतील भेद त्यांनी लक्षात घेतला नव्हता, असे जाणवते.

'नाट्यस्वरूप गडकरी' हा ग्रंथ लिहिणाऱ्या शं. ना. सहस्त्रबुद्धे यांची प्रेरणा म्हणजे वि. स. खांडेकरांचा 'गडकरी : व्यक्ती व वाङ्मय' हा ग्रंथ होय. पण नाट्यकृती निकोप मनाने पाहिल्या नाहीत की ग्रह-पूर्वग्रह कसे प्रबळ होतात आणि नाटककारावर व नाट्यकृतींवर ते कसे अन्यायकारक ठरतात, हेच शं. ना. सहस्त्रबुद्धे यांच्या ग्रंथावरून जाणवते. थोडक्यात, डॉ. वाळिंबेपूर्व काळातील समीक्षकांचे गडकऱ्यांच्या नाटकांचे आकलन स्थूल स्वरूपाचे, विस्कळित आणि एकांगी आहे. तत्त्वापेक्षा तपशीलाला या लेखकांनी अधिक महत्त्व दिले. गडकऱ्यांच्या नाटकांची समीक्षा करताना अनेकांनी गडकरी चरित्रावर अनावश्यक भर दिला.

डॉ. वाळिंबे यांचा 'एकच प्याला' या गडकऱ्यांच्या नाटकावरील पहिला ग्रंथ 'सुधाकर की एकच प्याला' प्रसिद्ध झाला, त्याच वर्षी प्रा. श्री. के. क्षीरसागरांची 'एकच प्याला'ला लिहिलेली विस्तृत प्रस्तावना प्रसिद्ध झाली.[२] ही प्रस्तावना गडकरी नाट्यसमीक्षेत महत्त्वपूर्ण ठरली. प्रा. क्षीरसागरांनी या प्रस्तावनेत 'एकच प्याला'च्या निमित्ताने केवळ शोकांतिकेचेच नव्हे तर जीवनविषयक चिंतन प्रकट केले. जीवनातील दु:खानुभवावर प्रकाश टाकला. 'एकच प्याला' या काव्यात्म आणि बहुकेंद्री नाटकाचे अंतरंग प्रा. क्षीरसागरांनी उलगडून दाखविले. त्यामुळे मराठीतील नाट्यसमीक्षा अनेक अंगांनी कार्यरत झाली. या पार्श्वभूमीवर डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी केलेली गडकऱ्यांच्या नाटकांची समीक्षा पाहाणे उचित ठरेल.

'नाटककार गडकरी' हा डॉ. वाळिंबे यांचा गडकऱ्यांच्या पाच नाटकांचे सविस्तर विश्लेषण करणारा मराठीतील पहिला प्रबंध म्हणता येईल. या ग्रंथाच्या प्रस्तावनेत डॉ. वाळिंबे यांनी म्हटले आहे की, हे नाट्यदृष्टीने आणि साहित्यदृष्टीने विवेचन केले आहे. डॉ. वाळिंबे हे गडकरीभक्त होते आणि गडकऱ्यांच्या वाङ्मयाचे उपासक होते. त्यामुळे नाटककार या दृष्टीने प्रत्येक घटनेच्या निर्मितीमागे असलेली गडकऱ्यांची भूमिका समजावून घेणे व त्या भूमिकेचा अर्थ विशद करणे हे त्यांनी आपल्या ग्रंथाचे मुख्य कार्य मानले. या लेखनात "नामूलं लिख्यते किंचित् ।" ही आपली प्रतिज्ञा त्यांनी पार पाडली आहे.

डॉ. वाळिंबे यांनी प्रस्तुत ग्रंथात प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, राजसंन्यास, भावबंधन, एकच प्याला या क्रमाने गडकऱ्यांच्या नाटकांचे सविस्तर विवेचन केले आहे. नाटकाचा विषय, नाट्यवस्तू, व्यक्तिरेखा, नाट्यरचना, उपकथानके, विनोद आणि भाषा या अंगांनी त्यांनी प्रत्येक नाटकाचे आपले आकलन मांडले आहे.

**'प्रेमसंन्यास'**

'प्रेमसंन्यास' हे गडकऱ्यांचे पहिले नाटक. या नाटकाने गडकऱ्यांना मराठी रंगभूमीवर नाटककार म्हणून प्रतिष्ठा मिळाली व पुढच्या नाटकांनी ती उत्तरोत्तर वाढत गेली. गडकऱ्यांच्या या पहिल्या नाटकावर उर्दू-फारसी रंगभूमीचा प्रभाव होता. त्यामुळे योगायोग, चमत्कार, असंभाव्य गोष्टी इ. ठासून भरलेल्या या नाटकाची मीमांसा डॉ. वाळिंबे यांनी एका कवीने लिहिलेले रोमँटिक नाटक या भूमिकेतून केली आहे.

लीला आणि जयंत यांचे विफल झालेले प्रेम हा डॉ. वाळिंबे यांना 'प्रेमसंन्यास'चा मुख्य विषय वाटतो. काव्यात्म प्रेमाची सफलता व्यवहारात होत नाही; मधुर स्वप्ने विरून जातात. आशांचा चुराडा होतो, ही गोष्ट गडकऱ्यांना लीला आणि जयंत यांच्या कहाणीद्वारे सांगावयाची होती, असे डॉ. वाळिंबे म्हणतात, दोन भिन्न वृत्ती-जीवांना कृत्रिम उपायांनी



अनुक्रमणिका

एकत्र बांधावयाचे आणि एकजीव झालेल्या, देह मात्र भिन्न, पण एकवृत्ती हृदयांना एकमेकांपासून दूर ठेवायचे, हा त्यांना या नाटकातील दैवदुर्विलास वाटतो. परस्परांवर पहिल्यापासून उत्कट प्रेम असूनही प्रेमिकांच्या त्या प्रेमाची परिणती विवाहात झाली नाही; तर दोघांचेही जीवन कसे उद्ध्वस्त होते, ते गडकऱ्यांना मुख्यत्वेकरून, या नाटकात दाखवायचे आहे, असे डॉ. वाळिंबे यांचे प्रतिपादन आहे. रोमँटिक नाटकाची प्रवृत्ती 'प्लॉट' समग्रतेने मांडण्याकडे असते, अशी गडकऱ्यांची धारणा असल्यामुळे या नाटकात विविध विषय येतात. विषमविवाहाचा निषेध, प्रीतिविवाहाची आवश्यकता, विधवेच्या विवाहाची तरफदारी, सामाजिक सुधारणांतील ग्राह्य भागांचे समर्थन, सामाजिक सुधारणांतील विकृत भागांची टवाळी हे विषय 'प्रेमसंन्यास' मध्ये कसे येतात, हे डॉ. वाळिंबे यांनी दाखवून दिले आहे. सामाजिक सुधारणांची तरफदारी करताना गडकरी या प्रश्नाची दुसरी बाजू कशी दाखवितात, सुधारणेच्या विकृत कल्पनांची मार्मिक टवाळी कशी करतात व यात नाट्यात्मक अलिप्तता कशी जपतात, हे डॉ. वाळिंबे साधार सांगतात. या नाटकातील जयंत, लीला, कमलाकर या प्रमुख व्यक्तिरेखांच्या अंतरंगाचे डॉ. वाळिंबे यांनी मार्मिक विश्लेषण केले आहे. गडकरी विनोदाचा उपयोग सर्वसामान्य प्रेक्षकांना हसविण्यासाठी कसा करतात, हे त्यांनी गोकुळच्या विनोदी प्रसंगातून दाखवून दिले आहे. मराठी नाटकात स्त्रीच्या कुरुपतेची चेष्टा 'प्रेमसंन्यास'पासून सुरू झाली, असे आपले निरीक्षणही डॉ. वाळिंबे यांनी नोंदवले आहे. 'प्रेमसंन्यास'मधील विनोदी प्रवेशांचा नाट्यात्मक परिणामाच्या दृष्टीने उपयोग होत नाही, असे त्यांना वाटते.

'प्रेमसंन्यास' नाटकाच्या कथानकात घटनांचे कच्चे दुवे राहिले आहेत, यात असंभाव्य घटनांची गर्दी आहे, चमत्कार आहेत, रचनेचा ढिसाळपणा आहे, तरीही मार्मिक कोट्यांचे ऐश्वर्य, उत्कट कल्पनाचित्रे, भीषण कल्पनाचित्रांचे सामर्थ्य, ही डॉ. वाळिंबे यांना 'प्रेमसंन्यास'ची जमेची बाजू वाटते. मुख्य म्हणजे शुद्ध, निर्दोष, पवित्र प्रेमाचे स्तवन म्हणून ते प्रेमसंन्यासकडे पाहातात. तरुण स्त्री-पुरुषांच्या निरागस आणि वासनारहित प्रेमाची कल्पना गडकऱ्यांनी मांडली, असे त्यांना वाटते.

**'पुण्यप्रभाव'**

पातिव्रत्याच्या रक्षणासाठी वसुंधरेने केलेला अलौकिक त्याग, हा डॉ. वाळिंबे यांना 'पुण्यप्रभाव'चा मुख्य विषय वाटत नाही, तर वृंदावनाचे परिवर्तन हा मुख्य विषय वाटतो. वृंदावन हा या नाटकाचा खलनायक नसून नायक आहे असे मानून या नाटकाची डॉ. वाळिंबे यांनी पाहणी केली आहे. त्यांनी वृंदावनाच्या भावनांच्या संघर्षाचा व आंदोलनांचा विस्ताराने विचार केला आहे. वृंदावनाच्या सोळा स्वगत भाषणांचे डॉ. वाळिंबे यांनी मार्मिक विश्लेषण केले आहे. वृंदावनाच्या तोंडी असलेल्या प्रतिमानांचा (Images) त्यांनी विचार केला आहे. नाटकात दाखविलेले वृंदावनाचे परिवर्तन त्यांना आकस्मिक वाटत नाही किंवा त्याच्या स्वभावचित्रणात काही विसंगती आहे असेही त्यांना वाटत नाही.

विचारांचे व भावनांचे पात्रांनी केलेले सूक्ष्म विश्लेषण हा 'पुण्यप्रभाव'चा खास विशेष आहे, असे त्यांना वाटते. या नाटकातील व्यक्तिरेखा खोल विचार करणाऱ्या व आपल्या भावनांचे स्वरूप आजमावण्यासाठी धडपडणाऱ्या आहेत, असे त्यांचे मत आहे. व्यक्तिरेखांतून गडकरी मानवी मनाच्या दोन बाजू कशा दाखवितात हे डॉ. वाळिंबे यांनी सोदाहरण दाखवून दिले आहे. गडकऱ्यांनी या नाटकात एकीकडे स्त्रीजातीची उदात्तता, तिचे अलौकिक मनोधैर्य, प्रतिष्ठितपणा, तर दुसरीकडे स्त्रीजातीविषयी कमालीचा अनुदारपणा दाखविला आहे. एकीकडे खानदानी सुसंस्कृतपणा आणि मनाचा उदारपणा तर दुसरीकडे





अनुक्रमणिका

हीन मनोवृत्तीचे असंस्कृत थैमान यांचे दर्शन घडविले आहे.

'प्रेमसंन्यास'प्रमाणे याही नाटकात असंभाव्य आणि भडक घटना आहेत. चमत्कार वाटावेत असे प्रसंग आहेत. 'पुण्यप्रभाव'ची नाट्यरचना कशी ढिसाळ आहे, याची अनेक उदाहरणे डॉ. वाळिंबे यांनी दिली आहेत. 'पुण्यप्रभाव'चे रचनाशैथिल्य दाखविताना त्यांनी या नाटकातील विनोदी प्रवेशांचा निर्देश केला आहे. 'पुण्यप्रभाव' नाटकात एकूण २९ प्रवेश आहेत व त्यांतील ११ प्रवेश विनोदी आहेत, या ११ विनोदी प्रवेशांतील ७ प्रवेशांचा नाटकाच्या मूळ कथानकाशी काही संबंध नाही, हे डॉ. वाळिंबे यांनी दाखवून दिले आहे. गडकऱ्यांना विनोदी प्रवेशांचे केवढे आकर्षण होते हे सांगताना डॉ. वाळिंबे म्हणतात की, हास्यरस उत्पन्न करण्यासाठी स्वतंत्र प्रवेश, हा विचार कृतीत आणण्यासाठी गडकऱ्यांनी 'पुण्यप्रभाव'मध्ये अग्निकुंडाचा चौदा पानांचा नवा प्रवेश लिहून काढला. 'पुण्यप्रभाव'मध्ये विनोदी प्रवेशांचे अधिक्य असले, तरी डॉ. वाळिंबे यांना या विनोदी प्रवेशांची कामगिरी महत्त्वाची वाटते. हे विनोदी प्रवेश मुख्य कथानकाला उपयुक्त नसले तरी हीन जगाचे दर्शन गडकऱ्यांनी या प्रवेशांतून यशस्वीपणे घडविले आहे आणि मार्मिक उपहास साधला आहे, असे डॉ. वाळिंबे यांना वाटते.

गडकऱ्यांच्या भाषावैभवावर प्रेम असणाऱ्या डॉ. वाळिंबे यांनी 'पुण्यप्रभाव'मधील भाषेचे, शब्दांचे आणि पदबंधांचे सविस्तर रसग्रहण केले आहे. ट्रान्स्फर्ड एपिथेट्सच्या धर्तीवर गडकऱ्यांनी मराठीत विशेषणांचा नवीन प्रकार कसा आणला, ते त्यांनी उदाहरणांसहित दाखविले आहे. उदा. अनोळखी आचरटपणा, सभय उत्सुकता किंवा गरीब लाज अशी विशेषणे गडकऱ्यांनी वापरली आहेत. गडकऱ्यांनी निर्माण केलेले नवीन शब्दही त्यांनी दिले आहेत. मोहक कल्पनाचित्रांनी रसरसलेले पुण्यप्रभावसारखे काव्य मराठी नाट्यसृष्टीत दुसरे नाही, असे त्यांना वाटते. गोड हुरहूर, स्मृतिचित्रात तल्लीन होण्याची आसक्ती, गूढरम्यतेचे आकर्षण ही रोमँटिक काव्याची वैशिष्ट्ये डॉ. वाळिंबे यांना 'पुण्यप्रभाव'मध्ये जागोजाग दिसतात.

### 'राजसंन्यास'

'राजसंन्यास' या गडकऱ्यांच्या अपूर्ण नाटकाची मीमांसाही डॉ. वाळिंबे यांनी केली आहे. 'राजा हा जगाचा इच्छाविरहित उपभोगशून्य स्वामी आहे.' हे प्रमेय मांडण्यासाठी गडकऱ्यांनी 'राजसंन्यास' हे नाटक लिहिले. या नाटकाच्या विषयाची निवड करण्यात गडकऱ्यांनी चातुर्य दाखविले, असे डॉ. वाळिंबे यांना वाटते. संभाजी हा नायकाच्या योग्यतेचा आहे. सद्गुणांची खाण असलेला संभाजी आपल्या स्वभावातील एका दोषामुळे विनाशाकडे जातो व तो आपल्याबरोबर इतरांचाही नाश करतो, अशी संभाजी या व्यक्तिरेखेची डॉ. वाळिंबे यांची मीमांसा आहे. या नाटकाच्या विवेचनात शोकांतिकेची सूत्रे लावून ते संभाजीची मीमांसा करीत नाहीत. पण शोकांतिकेच्या नायकाप्रमाणे त्यांना संभाजी गुणी आणि कर्तबगार वाटतो. शोकांतिकेचा नायक क्षुल्लक प्रमादामुळे विनाशाकडे जातो, त्याप्रमाणे संभाजी विनाशाकडे जातो, असे त्यांना वाटते.

गडकऱ्यांनी रंगविलेल्या संभाजीच्या व्यक्तिरेखेचे विशेषत: पश्चात्तापाने पोळलेल्या संभाजीचे आत्मविदारण डॉ. वाळिंबे यांनी मार्मिकपणे उलगडून दाखविले आहे. कर्तव्यासाठी आपल्या स्वत:च्या परमसुखाचा कठोरपणे त्याग करणे हे पुण्यप्रभाव, भावबंधन या नाटकांप्रमाणे 'राजसंन्यास'चेही सूत्र आहे, असे डॉ. वाळिंबे म्हणतात. नाट्यरचनेचे कौशल्य अथवा कुशल स्वभावलेखन ही डॉ. वाळिंबे यांना 'राजसंन्यास'ची बलस्थाने वाटत नाहीत, तर रमणीय शब्दयोजना व गद्यातील लयबद्धता ही बलस्थाने वाटतात. डॉ. वाळिंबे यांनी 'राजसंन्यास'चे भाषावैभव प्रकट केले आहे. गडकऱ्यांनी निर्माण केलेले नवीन शब्द, विशेषणे,

कल्पनाचित्रे आणि गद्यातील लयबद्धता या गडकरी-भाषेच्या विशेषांचा त्यांनी परामर्श घेतला आहे.

**'भावबंधन'**

भावबंधन हे गडकऱ्यांचे अखेरचे नाटक. आयुष्याच्या अखेरच्या दिवशी जिवाच्या कराराने त्यांनी ते पुरे केले. गडकऱ्यांना या नाटकाद्वारे एक 'Light comedy' लिहायची होती. पण मूळची कल्पना व सिद्धरूप यात अंतर पडले व गडकऱ्यांनी कारुण्य व गांभीर्य यांनी ओतप्रोत भरलेले नाटक लिहिले, असे डॉ. वाळिंबे म्हणतात. सर्वस्वाचा त्याग ही 'भावबंधन'ची मध्यवर्ती कल्पना आहे असे त्यांना वाटते. बेजबाबदार बोलण्याचे परिणाम हा डॉ. वाळिंबे यांना या नाटकाचा विषय वाटत नाही तर गडकऱ्यांनी कर्तव्याच्या पूर्तीसाठी, सर्वस्वाचा त्याग करावयास तयार होणे हे मानवी जीवनातील सर्वांत उदात्त व श्रेष्ठ मूल्य होय, या तत्त्वाचे आविष्करण करण्यासाठी प्रस्तुत नाटक लिहिले, असे डॉ. वाळिंबे यांचे प्रतिपादन आहे. त्यांना असे वाटते की, 'भावबंधन'मध्ये एका नाटकात गुंफलेली दोन नाटके आहेत. त्यांच्या मते, मालतीचे एक कथानक आहे व दुसरे लतिकेचे आहे.

'भावबंधन'मधील व्यक्तिरेखांची प्रेमविषयक भावना ही गडकऱ्यांच्याच मनातील धारणा असावी, असे त्यांना वाटते. उदा. प्रेमापेक्षा त्याग श्रेष्ठ आहे, प्रेमाची भावना कितीही प्रभावी व उत्कट असली तरी त्यागाची भावना ही तिच्यापेक्षा अधिक स्पृहणीय आहे आणि प्रेमापेक्षा कर्तव्यबुद्धी अधिक श्रेष्ठ आहे. या विचारांच्या आधारे डॉ. वाळिंबे यांनी 'भावबंधन'चे, पर्यायाने गडकऱ्यांचे अंतरंग प्रकट करण्याचा प्रयत्न केला आहे. आशापूर्ण काव्यमय प्रेम हे एक वेड असून ही आशेची कल्पनाचित्रे वस्तुस्थितीत उतरणे ही फार कठीण गोष्ट आहे, अशी गडकऱ्यांची धारणा असावी असेही त्यांना वाटते. 'पुण्यप्रभाव' नाटकातील वृंदावनाप्रमाणे डॉ. वाळिंबे यांनी घनश्यामाच्या परिवर्तनाची मीमांसा केली आहे. घनश्यामाचे परिवर्तन त्यांना सुसंगत वाटते, पण भावबंधन नाटकाचा शेवट त्यांना कलाशून्य व पूर्णपणे परिणामहीन वाटतो. नाटककाराने विकलांग अवस्थेत तो लिहिल्यामुळे असे झाले असावे अशी शक्यता ते व्यक्त करतात. या नाटकातील रचनाशैथिल्यही त्यांनी दाखवून दिले आहे.

कुरुपतादर्शन आणि कुरुपता उपहास हे डॉ. वाळिंबे यांना भावबंधनमधील विनोदाचे विशेष वाटतात. 'प्रेमसंन्यास' नाटकापासून सुरू झालेली स्त्रीच्या कुरुपपणाची टवाळी याही नाटकात मोठ्या प्रमाणात आहे. इंदू-बिंदूवरील या विनोदाचे डॉ. वाळिंबे यांनी समर्थन केले आहे. कुरुपतेची हेटाळणी ही त्यांना माणसाची प्रवृत्ती वाटते आणि गडकऱ्यांनी या विनोदातून मानवी जीवनातील व मानवी मनातील अनेक विसंगतींचे अतिशय मर्मभेदी आविष्करण केले आहे, अशी ते या विनोदाची मीमांसा करतात.

भावबंधनची भाषा व्यक्तिरेखांनुसार आहे, ही भाषा अधिक स्वाभाविक आणि सोज्वळ आहे, हे या भाषेचे वैशिष्ट्यही त्यांनी नमूद केले आहे. करुणगंभीर घटनांनी भारावलेली व ट्रॅजेडीच्या प्रांतात सतत घोटाळणारी 'भावबंधन' ही ट्रॅजिकॉमेडी आहे, असे डॉ. वाळिंबे यांना वाटते.

**'एकच प्याला'**

'एकच प्याला' या गडकऱ्यांच्या सर्वाधिक लोकप्रिय नाटकाने समीक्षकांना पुन:पुन्हा विचारप्रवृत्त केलेले दिसते. अनेकांना या नाटकांचा पुनर्विचार करावा लागला आहे. वि. स. खांडेकर १९३२ साली हे 'दारूवरचे नाटक आहे' असे म्हणत होते.[३] पण पुनर्विचार करताना १९४९ व १९६९ साली त्यांना दारू हे नाटकाचे निमित्त वाटते आणि 'एकच प्याला' अधिक उंचीवरचे म्हणजे सत्-असत् संघर्षाचे चित्र वाटते.

१९४६ साली डॉ. वाळिंबे यांनी 'सुधाकर की

एकच प्याला' या आपल्या ग्रंथात दारुचे दुष्परिणाम दाखविणे हाच गडकऱ्यांचा प्रधान हेतू आहे, असा निष्कर्ष काढला होता. पण १९५७ मध्ये आपल्या या निष्कर्षाचा पुनर्विचार करण्याची आवश्यकता डॉ. वाळिंबे यांना वाटली. पुनर्विचारानंतर डॉ. वाळिंबे यांनी 'अनेक चांगल्या गुणांनी युक्त असलेल्या कर्तबगार मनुष्याचा त्याच्या आत्यंतिक मनोवृत्तीमुळे झालेला नाश'[४] हा 'एकच प्याला'चा प्रमुख विषय मानला. अतिशय मानी असलेल्या सुधाकराने आत्यंतिक मनोवृत्तीमुळे केलेला प्रमाद त्याला दारुच्या मोहाला बळी पडावयास भाग पाडतो व या आत्यंतिक मनोवृत्तीमुळे व्यसनमुक्त होणे अशक्य झाल्यामुळे त्याचा विनाश अपरिहार्य ठरतो, असे या विषयाबाबत डॉ. वाळिंबे यांनी स्पष्टीकरण केले आहे.

शेक्सपिअरच्या शोकांतिकेच्या सूत्रांनुसार डॉ. वाळिंबे यांनी 'एकच प्याला'ची पाहणी केली आहे. सुधाकराच्या व्यक्तिरेखेतून ट्रॅजिक हिरोची मूळ कल्पना प्रत्यक्षात उतरली नाही. ट्रजिक हिरो म्हणून सुधाकर कसा कमी पडतो, हे सांगताना डॉ. वाळिंबे म्हणतात की, गडकऱ्यांना सुधाकराच्या मनातील संघर्ष पराकोटीला गेलेला दाखविणे जमले नाही. सुधाकराला आपल्या मानहानीवर उपाय म्हणून तळीरामकडून दारुचा मार्ग सांगितला जातो, तो डॉ. वाळिंबे यांना नाट्यात्मक प्रमाद वाटतो. या नाट्यात्मक प्रमादामुळे नाटकाला दारुच्या दुष्परिणामांचे रूप आले व त्यामुळे एक शोकांतिका म्हणून अपयश आले, असे त्यांचे प्रतिपादन आहे. शोकांतिकेचा नायक म्हणून सुधाकराच्या व्यक्तिरेखेची अशी मीमांसा केली असली तरी सुधाकराच्या उत्तरकालीन चित्रणात डॉ. वाळिंबे यांना त्याच्या व्यक्तित्वाच्या भव्यतेचा प्रत्यय येतो.

सुधाकराचा विनाश जसा त्याच्या स्वभावाने ठरवून टाकला आहे, तसा सिंधूचा विनाशही तिच्या स्वभावानेच निश्चित करून टाकला आहे, असे त्यांना वाटते. सिंधूला त्यांनी हळवी आणि दुबळी मानले. सिंधूने सुधाकराला मद्यापासून परावृत्त करण्यासाठी काहीच प्रयत्न केले नाहीत, असा या व्यक्तिरेखेवर आक्षेप घेऊनसुद्धा त्यांनी सिंधूच्या वर्तनाचा लावलेला अन्वय महत्त्वाचा आहे. सुधाकरावर एक विचित्र आपत्ती आली आहे. सुधाकर संकटात असताना माणुसकीच्या धर्मातून त्याला सोडून जाणे ती अनुचित मानते, असे डॉ. वाळिंबे म्हणतात. (अलीकडचे मनोविकारतज्ज्ञ मद्यपाश हा एक आजार मानतात; या विचाराशी डॉ. वाळिंबे यांनी लावलेला सिंधूच्या वर्तनाचा अन्वय जुळतो.)

रामलाल आणि तळीराम या दोन महत्त्वाच्या व्यक्तिरेखांचे त्यांचे आकलनही अत्यंत मार्मिक आहे. रामलालच्या व्यक्तिरेखेतून गडकऱ्यांनी आत्मवंचना आणि मानवी मनाचा अनाकलनीय कमकुवतपणा दाखविला आहे असे त्यांना वाटते. तळीरामबद्दल डॉ. वाळिंबे म्हणतात, 'जीवनातील सारी मूल्ये उरफाटी करून टाकणाऱ्या तळीरामच्या नतद्रष्ट, नाठाळ पाखंडीपणाच्या रूपाने गडकऱ्यांनी जीवनाच्या दुसऱ्या भागावरील आवरण काढून घेऊन त्यावर अंतर्भेदी प्रकाशाचा तीव्र झोत टाकला आहे आणि उच्च सद्‌गुणांचे व उदात्त ध्येयवादाचे निष्ठेने पूजन करणाऱ्या भाविक श्रद्धेला अंतर्मुख व्हावयास लावले आहे.'[५] 'एकच प्याला'मधील आर्य मदिरा मंडळ डॉ. वाळिंबे यांना नाट्यरचनेच्या दृष्टीने आक्षेपार्ह पण नाट्यात्मक परिणामाच्या दृष्टीने यशस्वी वाटते.

'एकच प्याला'वर डॉ. वाळिंबे यांचा मुख्य आक्षेप रचनेच्या संदर्भातील आहे. गडकऱ्यांना रचनेच्या स्वैरपणाचा मोह होतो. त्यामुळे नाट्यरचनेतील प्रमाणबद्धतेची हानी झाली व रचनेच्या दृष्टीने वैगुण्य आले, असे त्यांना वाटते. रचनेच्या स्वैरपणाचा गडकऱ्यांना मोह का होतो, याची कारणमीमांसा मात्र डॉ. वाळिंबे यांनी केली नाही. डॉ. वाळिंबे यांनी 'एकच प्याला'चे एक नाटक म्हणून साकल्याने विवेचन केले. गडकऱ्यांच्या निर्मितीमागील प्रयोजन



अनुक्रमणिका

लक्षात घेऊन त्या त्या घटना-प्रसंगांची अपरिहार्यता पाहिली. नाट्यरचना व घटनाक्रम यांचा संबंध त्यांनी तपासला. डॉ. वाळिंबे यांनी सुधाकर या नायकाच्या संदर्भात शोकांतिकेची चर्चा केली. पण एक शोकांतिका म्हणून 'एकच प्याला'तील समग्रतेने जाणवणाऱ्या नाट्यानुभवाची मीमांसा मात्र त्यांनी केली नाही.

'नाटककार गडकरी' या ग्रंथात डॉ. वाळिंबे यांनी गडकऱ्यांच्या पाच नाटकांचे सामग्र्याने आकलन मांडले. नाटककाराच्या मनोभूमिकेतून घटनांचा व व्यक्तिरेखांचा अन्वय लावला. वाळिंबेपूर्व काळात गडकऱ्यांच्या नाटकांचे एवढ्या साकल्याने आकलन मांडले गेलेले दिसत नाही. आपल्या ग्रंथाद्वारे डॉ. वाळिंबे यांनी गडकरी अभ्यासकांना विविध स्वरूपाची माहिती उपलब्ध करून दिली.

'नाटककार गडकरी' या ग्रंथानंतर १९८७ मध्ये गडकऱ्यांच्या नाटकांचा पुनर्विचार करताना त्यांना गडकऱ्यांची नाटके टवटवीत वाटतात.[६] गडकऱ्यांच्या नाटकांच्या लोकप्रियतेची कारणे डॉ. वाळिंबे यांनी पुढीलप्रमाणे सांगितली आहेत– १) कर्तबगार नटांची जोड २) नाट्यात्मकतेच्या दृष्टीने उत्कट ठरतील अशा घटना ३) प्रमुख व्यक्तिरेखांचे स्वभावचित्रण, ४) अनेक उत्कट काव्यमय प्रसंग ५) भाषेचे वैभव ६) विनोद.

गडकऱ्यांचे नाट्यदोषही डॉ. वाळिंबे यांनी पुढीलप्रमाणे सांगितले आहेत– १) ढिसाळ रचना २) विसंगती ३) असंभाव्य घटना ४) प्रमाणशून्यता ५) इतिहासजमा झालेल्या सामाजिक समस्या ६) पातिव्रत्याच्या जीर्णशीर्ण पौराणिक कल्पना, पण या सर्व दोषांवर गडकऱ्यांच्या नाटकांतील वाग्विलास मात करतो, असे त्यांना वाटते. ज्ञानदेवांनंतर सातशे वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात गडकऱ्यांसारखा दुसरा शब्दप्रभू झाला नाही, असे ते म्हणतात. गडकऱ्यांच्या गद्यभाषेत लयबद्धता आहे, रुपकात्मकता आहे, शब्दांचा आणि पदबंधांचा सौष्ठवपूर्ण वापर आहे. प्रतिमानांचा वापर आहे. या भाषेत कल्पनाविलासाचे अनेक अक्रतिम नमुने आहेत. अशा रीतीने नागर पदबंधांचा डोळे दिपविणारा खजिना गडकऱ्यांनी आपल्या नाटकांतून उघडा करून ठेवला आहे. या खजिन्याची झलक डॉ. वाळिंबे यांनी आपल्या ग्रंथात दाखविली आहे. गडकरीवाङ्मयाच्या अभ्यासाची अनेक अंगे डॉ. वाळिंबे यांनी भावी अभ्यासकांसाठी उपलब्ध करून ठेवली आहेत.

भिन्न अभिरुचीच्या व विचारसरणींच्या अनेक समीक्षकांनी आजवर गडकऱ्यांच्या नाटकांचे विवेचन केले आहे.

प्र. के. अत्रे, त्र्यं. वि. सरदेशमुख, म. वा. धोंड यांसारख्या भिन्न अभिरुचीच्या समीक्षकांनी गडकऱ्यांच्या नाटकांचे विवेचन केले आहे. गडकऱ्यांच्या नाटकांचा आजवर अनेकांनी विविध दृष्टिकोनांतून परामर्श घेतला. गडकऱ्यांच्या नाटकांचा विचार मराठी साहित्यात यापुढेही होत राहील. या सर्व गडकरी अभ्यासात वा विचारात डॉ. वाळिंबे यांच्या 'नाटककार गडकरी' या ग्रंथाला एक ऐतिहासिक महत्त्व आहे, यात शंका नाही.

## संदर्भ व टीपा


१) ना. सी. फडके - किर्लोस्कर, देवल, गडकरी, मुंबई १९५९, पृ. १६१.
२) श्री. के. क्षीरसागर - एकच प्याला, टीकात्मक विवेचन, एकच प्याला– ७ वी आवृत्ती, पुणे, १९४६.
३) वि. स. खांडेकर - गडकरी : व्यक्ती आणि वाङ्मय पुणे, १९३२.
४) रा. शं. वाळिंबे - नाटककार गडकरी, पुणे १९५७, पृ. २३७.
५) तत्रैव - पृ. ३१६
६) रा. शं. वाळिंबे - गडकरी संघर्ष आणि व्यथा, पुणे, १९८७, पृ. १ ते ७.


◇◇◇


**विनायक गंधे**
सी. २०१, राधिका सहकारी गृहरचना संस्था,
पर्वतीनगर, सिंहगड रोड, पुणे - ३०.









अनुक्रमणिका

# कला ही जीवनाची पुनर्निर्मिती : ग्रेस

– मनोहर सोनवणे

*"साक्षात्कारी मांडणी करीत जाणे हेच कलेचे अधिष्ठान आहे" – आहे त्या वस्तुमानातून, दृश्यातून वा नित्य येणाऱ्या अनुभवातूनच, नवे रूप–नवी लय–नवी अनुभूती जाणवली की कलेचा संभव होतो. 'कॅलिडियोस्कोप'मधून आहे त्याच वस्तुमानाचे वेगळेवेगळे आकार दृग्गोचर होतात. परंतु कवितेची मांडणी, केवळ वस्तूंची मांडणी नसते. कोणत्याही रचनेच्या मागे अदृश्य प्रतिभाशक्तीचे पाठबळ असते. ह्या पाठबळातूनच नाविन्यपूर्ण साक्षात्कार होतो. त्यालाच ग्रेस 'साक्षात्कारी मांडणी' म्हणतात. त्यातूनच एक अनामिक गूढार्थ व्यक्त होत असलेला त्यांना संवादित होतो. त्या गूढार्थामागे शब्द आपला स्वयंभू आकार घेऊ लागतो. एक 'लय' प्रकट होऊ लागते. मग ती लय कधी शार्दूलविक्रीडितात तर कधी भुजंगप्रयातात व्यक्त होऊ लागते. वृत्तीच वृत्तमय होऊ लागते. 'ग्रेस' यांची वृत्तबद्धता अशी स्वतंभू आहे. प्रा. म. वा. धोंड म्हणतात, 'अभंग आणि ओवी' एकच मांडणी आहे.' निरूपणासाठी ओवी तर भक्तिगायनासाठी अभंग! ग्रेस म्हणतात त्याप्रमाणे प्रतिमा-प्रतीकांनुसारी शब्दांची, शिल्पाची, स्वरांची लय एकच! पुनर्निर्मिती जीवनानुभवाची!' पुनर्नवा सृष्टीसारखी!*

*– संपादक*

कविवर्य ग्रेस हे मराठीतील अजोड कवी आहेत, याबद्दल कुणाचेही दुमत असणार नाही. त्यांच्या पूर्वपरंपरेचा धागा स्पष्टपणे दाखवता येत नाही आणि त्यांच्या कवितेच्या अनुकरणाचे आजवर अनेक प्रयत्न झाले, तरी ते कोसळून पडले आहेत. 'ग्रेस स्कूल' निर्माण होऊ शकलेलं नाही, या अर्थाने ते स्वयंभू कवी आहेत. त्यांनीच म्हटल्याप्रमाणे, 'ही मुळातच अनवट बीज संभवाची निर्मिती आहे. ही निर्मिती इतकी पृथगात्म आहे की या वंशाची परंपरा संभवू शकत नाही.' एकूणच ग्रेस व त्यांची निर्मिती रचना व आशयाच्या अंगाने मराठी साहित्यातील एक स्वतंत्र पीठ आहे; आणि तो समस्त मराठी सारस्वतांचा एक मानबिंदू आहे. अलीकडेच त्यांच्या 'वाऱ्याने हलते रान' या ललितबंधांच्या संग्रहाला साहित्य अकादमीने पुरस्कार देऊन गौरवले आहे. या निमित्ताने त्यांच्या ललितबंधांकडे वाचक-रसिक-जाणकार-अभ्यासक अशा साऱ्यांचं लक्ष वेधलं जाणं स्वाभाविक म्हणता येईल.



ग्रेस यांची कविता जितकी स्वतंत्र व स्वाभाविक आहे, तितकेच त्यांचे ललितबंध स्वतंत्र व स्वाभाविक आहेत, असं म्हणता येईल. 'चर्चबेल' (१९७४), सितवा (१९८७), संध्यामग्न पुरुषाची लक्षणे (२०००), मृगजळाचे बांधकाम (२००३), वाऱ्याने हलते रान (२००८), कावळे उडाले स्वामी (२०१०) व अलीकडे प्रकाशित झालेला एक असे त्यांचे सात ललितबंध संग्रह आतापर्यंत प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या कवितासंग्रहांची संख्याही जवळपास इतकीच आहे, म्हणजे कवितेच्या बरोबरीने त्यांचं ललित गद्य लेखन झालं आहे. विशेष म्हणजे ग्रेस यांच्या कवितेची आणि ललित गद्याची जातकुळी एकच आहे. या दोहोंची निर्मिती एका समान पायावर झाली असल्याचं आढळतं. ग्रेस आपल्या ललितबंधांतून मूलत: आपल्या निर्मितीप्रक्रियेचा मागोवा घेत असतात. 'वाऱ्याने हलते रान' या संग्रहाच्या अर्पणपत्रिकेत त्यांनी म्हटलंय, 'हे तुमचे तुम्हालाच अर्पण करतोय.... वाऱ्याने --- रान या आभासाच्या अलीकडे, भासाच्या पलीकडे वाऱ्याला गाठता येईल काय?' हा वारा काय आहे? तो रानाला हलवणारा आहे... निर्मितीची

आंदोलनं पकडता येतात का? तिच्या आदि-अंतापर्यंत पोहोचता येतं का? स्वत: निर्मात्यालाच हे प्रश्न पडलेले आहेत; आणि ते तसे पडलेले असतातच, पडणारच. कारण निर्मिती ही एक त्या मिश्र प्रक्रिया आहे, ती स्वाभाविकरीत्या घडून येत असली तरीही... जाणीवपूर्वक निर्मिती करणाऱ्यांची गोष्ट वेगळी, त्यात कृत्रिमता असते. 'माझी कविता मलाही समजत नाही,' अशा आशयाचं ग्रेस बोलतात कारण त्यांच्याकरिता ती एक जैव प्रक्रिया असते. ग्रेस यांनी लिहिलं आहे, 'कलावंत आपल्या निर्मितीतून कोणत्याच शक्तीची शक्यता गोंजारत नाही. शक्ती वेगाने येते; आणि वेगानेच कोसळत निघून जाते. कलावंताचा बाणा शक्तीवर नाही, तर क्षमतेवर अवलंबून असतो. अनंत क्षमतांची शक्यता निर्मित जाणे, हेच कलेचे कार्य आहे.' (पृ. ७३)

उत्कट आणि तळामुळापासून जन्म घेणारी अभिव्यक्ती हे ग्रेस यांच्या निर्मितीचं एक स्वभाववैशिष्ट्य. ते त्यांच्या ललितबंधांमधूनही जाणवतं. ते त्यांच्या कवितेइतकेच उत्कट आहेत. एकान्त चिंतनात डुंबून जाणं, आठवणींचे तळ उसवत राहाणं, ऋतु-प्रहरांचे बदल सोसणं, आत्मिक आणि शारीर अशा दोहों अनुभूतींच्या संगती-विसंगती, आतल्या आणि बाहेरच्या हाकांचे ध्वनी-प्रतिध्वनी या साऱ्यांचं एकवट रसायन या ललितबंधांमध्ये आढळतं. त्यामुळे त्यांचे ललितबंध त्यांच्या कवितेइतकेच व्यामिश्र आहेत. अर्थात् आपल्या कवितेचं सुबोध मार्गदर्शन करण्याकरिता ग्रेस यांनी ललितबंध लिहिलेले नाहीत. निर्मिती-प्रक्रियेविषयीचं त्यांना वाटणारं कुतूहल हा त्यांच्या ललितबंधांचा गाभा आहे. त्यामुळे त्यांचे ललितबंध हे त्यांच्या कवितेचंच 'एक्सटेन्शन' वाटू शकतं.

संध्याकाळ, एकान्त-एकटेपण, सृजन, दु:ख, आई इत्यादी असे घटक आहेत, जे ग्रेस यांच्या कवितेशी एकजीव झालेले आहेत. ग्रेस यांच्या ललितबंधांमधून वेगवेगळ्या संदर्भांत या घटकांचं पृथक्करण होताना आढळून येतं. 'संध्याकाळच्या कविता' या ग्रेस यांच्या पहिल्या कवितासंग्रहातील पहिली कविता साऱ्यांनाच माहीत आहे.

*'क्षितिज जसे दिसते*
*तशी म्हणावी गाणी...'*

संध्यासमय, या समयी झाकोळून येणाऱ्या संवेदना, दु:खाची लकेर आणि या समयीचे आर्त असे सारे या कवितेत दाटून येते; आणि शेवटच्या ओळी येतात,

*'बुडता बुडता सांज प्रवाही*
*अलगद भरूनी यावे...'*

मावळत्या सूर्याचं शांत-गडद सोनेरीपण पाण्यावर पसरलं आहे आणि पाण्याच्या संथ लाटांवर ते हिंदकळत आहे, असं दृश्य या ओळी वाचल्यानंतर माझ्यासमोर येतं किंवा असं दृश्य पाहिल्यानंतर या ओळी मनात येतात. या दृश्यात एक प्रकारची हुरहूर आहे, एक चैतन्य लवकरच अंधारात बुडणार आहे याची जाणीव आहे, पण त्याचबरोबर चैतन्याच्या झालेल्या स्पर्शाची शिरशिरी आहे, थरथर आहे, त्याची सूक्ष्म जाणीवही आहे. या भावावस्थेचं वर्णन काय करावं? मला समजलेले ग्रेस यांच्या कवितेचे आर्त असे आहेत. ते तुम्हाला छिन्नविछिन्न करीत नाहीत. तुमच्या जिवंतपणाला ते स्पर्श करतात. अर्थात् ग्रेसच्या कवितेची अनुभूती प्रत्येकाची स्वतंत्र असू शकते. ग्रेस शब्दार्थाने समजून घ्यायचे कवी नाहीत. त्यांचे शब्द संवेदना घेऊन येतात. या संदर्भात ग्रेस यांनी त्यांच्या एका मुलाखतीत म्हटलं होतं, "काव्याच्या सौंदर्य-संघटनात जे शब्द येतात, त्यांचा अर्थ कोणत्या शब्दकोशात शोधावयाचा? सामाजिक भाषेतील शब्दांना इथे कवीने आपल्या व्यक्तिमत्त्वाचा अर्थ दिलेला असतो, म्हणून शब्द शेवटी कवितेत साधनरूप ठरतात, माध्यमरूप नाहीत. कलावंतांची भावानुभूती हे माध्यम असते. मीही या प्रक्रियेला अंतिम तात्त्विक अर्थाने मान्यता देतोच..."

मुद्दा हा की, 'संध्याकाळ' ही ग्रेस यांच्या निर्मितीशी





अनुक्रमणिका

एकजीव झालेली एक प्रतिमा आहे, ती त्यांच्या साऱ्या निर्मितीमधून पुनरावृत्त होत असते.

'वाऱ्याने हलते रान' मधील 'जाऊबाईच्या आख्यानातील चिमणीचा वारा' या ललितबंधामध्ये ग्रेस लिहितात, 'साध्या ओक्याबोक्या सांजेची बोळवणी करताना मी तपशीलाचे थोबाड ढुंकूनही पाहात नाही. सरळ धूळवाटांत लपून बसलेला गाईचा हंबरडा सजवितो; आणि मग माझ्या प्रेमकवितेची उदास कुटुंबकहाणी, माझ्या तळहातावर तुरुतुरु चालू लागते.'

यासाठी ग्रेस यांनी आपल्या कवितेचं उदाहरण दिलं आहे–

*'तुझ्या मिठीत मी ढळे तशीच वासरे मला*
*वनात गाय शोधिता कसा सुगंध लागला...'*

'संध्याकाळच्या कविते'तील 'गाय जशी हंबरते तसेच व्याकूळ व्हावे' या ओळीतील गाय आणि ही गाय.... ग्रेसच्या कवितांमधील प्रतिमा व्यामिश्र रूपांनी आपल्याला भेटत असतात, हे ललितबंधांतही घडतं.

'संध्यामग्न पुरुषाची लक्षणे' या संग्रहातील पहिल्या ललितबंधात आसक्ती आणि विरक्तीच्या मधून वाहणारी गंगा.... आणि संध्याकाळ दोन्हीही भेटतात; आणि ग्रेस इथे 'प्राचीन' होऊन जातात. (याचा ऊहापोह पुढे आहेच.) त्यांनी लिहिलंय, '.... वाहतोच आहे. ऐलतीरावर सत्यवती. पैलतीरावर पराशर. नि मधून वाहणारे (की घडणारे?) महाभारत की सत्याची जन्मकहाणी! 'ईशावास्यामिदं सर्व' असे म्हणून समग्र ब्रह्मांडपात्रावर नैवेद्याचे तुळशीपत्र ठेवताना कसे झळकले असेल अर्धसत्याच्या ओंजळीतील पाणी! ही सारी संध्याकाळची व संध्यामग्नतेची लक्षणे...'

संध्याकाळ म्हणजे आसक्ती-विरक्तीच्या मधला प्रदेश... तो दुःख घेऊनच उभा आहे, ग्रेस यांची 'संध्याकाळ' या दुःखाभोवती आहे. 'आसक्ती-विरक्तीच्या मधून वाहणाऱ्या गंगेच्या ओघातच मला माझ्या मुक्तीचा – कलावंताच्या मुक्तीचा मार्ग शोधावा लागणार आहे. रोज संध्याकाळी पावले वाजवत जाणाऱ्या त्या तेजस्वी महापुरुषाला असंख्य प्रश्न विचारत विचारत या पाण्याच्या प्रवाहात पाय रोवून मला संध्यामग्नतेच्या समईत स्वतःचीच फुलवात उजळून घ्यावी लागणार आहे...'

एकान्त हा ग्रेस यांच्या निर्मितीचा स्थायीभाव आहे, असं म्हटलं तर ते वावगं ठरणार नाही. अलीकडेच 'अनुभव' मासिकाच्या वतीने झालेल्या दुसऱ्या ई-साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात ग्रेस म्हणाले, "कला किंवा कविता यांना मी निर्मितीचे क्षेत्र समजतो. कलेची निर्मिती ही एकान्तात होत असते. ते केवळ निर्मितीचेच क्षेत्र नाही तर जगाच्या आणि जीवनाच्या पुनर्निर्मितीचे क्षेत्र आहे." ग्रेस यांनी अक्षयकुमार काळे यांना दिलेल्या प्रदीर्घ मुलाखतीत म्हटले आहे, "एकान्त व एकाकीपण ही माझ्या निर्मिती-प्रक्रियेची जशी शैली नाही; तसेच ते वैशिष्ट्यही नाही. तिचा तो फक्त स्वभाव आहे." 'राजपुत्र आणि डार्लिंग' या कवितासंग्रहाच्या प्रारंभी त्यांनी 'एमिली डिकन्सनचं एक अवतरण दिलं आहे.' 'इट माइट बी लोनलिअर विदाऊट लोनलीनेस.' ग्रेस यांचं आणि त्यांच्या निर्मितीचं नातं यातून आपल्याला समजू शकतं. ग्रेस यांची एक कविता आहे, 'या एकट संध्यासमयी शब्दांचा जीव वितळतो...' संध्याकाळ... एकटेपण.... निर्मिती ही संगती या ओळीतून स्पष्ट होऊ शकते.

ग्रेस यांच्या निर्मितीत संध्याकाळ जशी वेगवेगळे आयाम घेऊन व्यक्त होते, तसाच पाऊसही सातत्याने निनादत असतो. या पावसाचं नातंही पुन्हा निर्मितीशी आणि दुःखाशी आहे. पाऊस हे एका अर्थाने सृजनाचं प्रतीक आहे, पण तेही दुःखाशिवाय नाही.

*'पाऊस कधीचा पडतो*
*झाडांची हलती पाने*
*हलकेच जाग मज आली*
*दुःखाच्या मंद स्फुराने...'* किंवा
*'ती गेली तेव्हा रिमझिम पाऊस निनादत होता...'*



अनुक्रमणिका

'मितवा'च्या ललितबंध संग्रहात ग्रेस यांनी एके ठिकाणी म्हटले आहे, 'My poetry is like the sad evening rainbow of August, which unites both of my strenuous worlds, the world of lyrical madness and the world of requiem.'' 'वाऱ्याने हलते रान' मधील एका बंधात ते म्हणतात, ''पाऊसपंथाचीं ही वाटचाल, तिचा भुरभुरणारा निनाद आणि लहरणारे ढगांचे मळभ, माझ्या पडवीपासून तर माझ्या देव्हाऱ्यापर्यंत, माझ्या नखापासून तर माझ्या हृदयापर्यंत गेली. चाळीस वर्षे तळहातावर कापराची वडी जाळतात त्याप्रमाणे इंद्रधनुष्यीय पाऊसकाळाचे रहस्योद्घाटन करण्यासाठी, अजूनही निरांजनातील शुभ्र कंपनलहरींप्रमाणे आपल्या वर्षगांधाराची चिमुकली तडफड जपून आहे.''

पाऊसकाळ हा ग्रेस यांना आदिम पुरुषासारखा भासतो. त्याच्या सृजनभावाचे आदिम अवशेष जसे त्यांना जाणवतात; तसा त्याच्या हातातला विशाल कमंडलूही जाणवतो – हा संन्यस्तभाव... ग्रेस यांची कविता अशा परस्परविरोधांच्या चिंचोळ्या भूमीतून प्रवास करत असते. ती निर्णय करत नाही, अनुभूती मात्र देते. कसा असतो पाऊस? असं म्हणताना ग्रेस म्हणतात,

*'कशी देवाची करणी?*
*अस्सा असतो पाऊस?*
*कधी राणीची पालखी*
*कधी राजाचा उरूस...'*

ग्रेस यांचा पाऊस कधी 'कोसळत' असतो, तर कधी 'निनादत' असतो. अनुभूतीची ही भिन्न रूपेच नाहीत काय?

ग्रेस यांच्या प्रतिमाविश्वातील एक लख्ख प्रतिमा आहे. 'आई' त्यांच्या ललितबंधांतही प्रतिमा डोकावतच असते. आई सृजनाचं, मातृत्वाचं किंवा वात्सल्याचं प्रतीक म्हणून मानलं जातं. ग्रेस म्हणतात, 'त्यांची 'आई' तशी नाही. संपूर्ण स्त्रीत्वाचं सर्वोच्च प्रतीक म्हणून ते त्यांच्या कवितेत अवतरतं. केवळ 'स्त्री'चं नव्हे, तर 'स्त्री'तून निर्माण होणाऱ्या सर्व नात्यांचंही ते प्रतीक आहे. अक्षयकुमार काळे यांना दिलेल्या मुलाखतीत ते म्हणतात, ''माझी आई-माझी प्रेयसी, माझी आई-माझ्या सुख-दुःखांचे चिन्ह. माझी आई-माझ्या वासनांचे स्मृतिरूप जागरण, माझी आई- स्त्री देहाच्या शक्तींचं अंतिम भयाण केंद्र. माझी आई-माझे क्रौर्य आणि माझी आई-माझी करुणा... आणि म्हणून वूमन इज नॉट माय प्रॉब्लेम, शी इज माय डेस्टिनेशन...''

ग्रेस यांच्या कवितेत अनेक स्त्री-प्रतिमा भेटतात. त्यांच्या ललितबंधांमधून अनेक स्त्रिया डोकावतात. त्यांचा उलगडा (अर्थातच पूर्णांशाने नाही) यातून होऊ शकतो. त्यांच्या ललितबंधांतल्या काही स्त्रिया वर्तमानातील असतात, काही आठवणींमधील असतात तर काही महाभारत-रामायणातील असतात. स्त्रीत्वाची अनेक रूपं त्यातून दिसतात. स्त्री-पुरुष नात्याचा शारीर आणि ....... वेध त्यातून जाणवतो. वासना आणि वेदनेचं दुःख त्यातून व्यक्त होतं. त्याचबरोबर त्यातील जीवनभाष्यही प्रतीत होतं. जीवनाच्या पूर्णतेच्या-अपूर्णतेच्या खुणा जाणवतात. पुन्हा या साऱ्या वाचकाने जाणून घ्यायच्या गोष्टी आहेत. वाचकाला त्या वेगवेगळ्या जाणवू शकतात. पण या प्रतिमा ग्रेस यांच्या निर्मितीचं एक शक्तीकेंद्र आहे, हे निश्चित. निर्मितीच्या प्रक्रियेतील या प्रतिमांचं स्थान ग्रेसही मान्य करतात.

ग्रेस यांचं प्रतिमा-प्रतीकांचं विश्व मोठं आहे. त्यांच्या प्रतिमांचा त्यांच्या कवितांच्या आणि त्यांच्या ललितबंधांच्या अंगाने जो परिचय घडतो; त्यातील काही ठळक प्रतिमांचा ऊहापोह इथे आपण केला आहे. पण केवळ काही प्रतिमांनी त्यांचा काव्यबंध किंवा ललितबंध पूर्ण होतो, असं नाही. कधी कधी त्यांच्या कवितेत प्रतिमांमागून प्रतिमा येतात, कधी प्रतिमांची विलक्षण सरमिसळ दिसते. कधी संपूर्ण

कविताच एक रूपक बनते. ग्रेस म्हणतात, ‘मी मुळात प्रतिमावादी नाही, तर प्रतीकवादी आहे. पण मी प्रतिमावादी भासतो, याचे एक कारण, मी एखाद्या छोट्याशाही कवितेत प्रतिमांचा वर्षाव करीत असतो.’

कदाचित ग्रेस यांची कविता दुर्बोध वाटते ती प्रतिमांच्या या मांडणीमुळे. ग्रेस यांनी म्हटलं आहे, ‘अद्‌भुताचे मला अचाट आकर्षण आहे. दुर्बोधता मुख्यत्वेकरून अद्‌भुताच्या अवतरणामुळे येते. मांडणी ही प्रतिमांच्या मंत्रोच्चारित चेटूकाप्रमाणे उभी राहते, म्हणजे मांडणी मॅजिक पोएट्रीचा भास निर्माण करते...’’ आधी म्हटल्याप्रमाणे ग्रेस यांची कविता म्हणजे संवेदनांचा तीव्र प्रवाह आहे. त्यांच्या शब्द, प्रतिमा, प्रतीकं, मांडणी ह्या साऱ्याला एक लय, एक नाद असतो. या साऱ्याच्या समुच्चयातून जे काही निर्माण होतं, ते आपल्या संवेदनांच्या तळाला भिडतं स्पर्शाचा अर्थ आपल्याला स्पर्शातूनच समजतो, जाणवतो. या अनुभवाला शब्द दिले, तर त्या शब्दांतून स्पर्शाची नेमकी अनुभूती जाणवेलच याची खात्री नाही देता येणार! ग्रेस यांची कविता संवेदनांच्या पातळीवर झेलली पाहिजे, असं माझं मत आहे.

ग्रेस स्वत:ला प्राचीन कवी मानतात. ‘वाऱ्याने हलते रान’ मधील एका ललितबंधात त्यांनी म्हटलं आहे, ‘मी प्राचीन काव्यपुरुष आहे, वर्तमानाचा कितीही कैवारी होतो म्हटले तरी कोणत्याही सबबीवर, अटीवर मी भूतकाळाचा एक क्षणभरही त्याग करू शकत नाही. भूतकाळाचा त्याग करणे ही माझी जीवनप्रेरणा नाही, ती माझी निर्मिती-प्रक्रियाही नाही. आयुष्याने माझ्यावर हात उगारला तर तो हातही थोपवू शकतो काही काळ. तो हातच तोडून टाकण्याची भेदक लालसा मला भेडसावू शकत नाही. भूतकाळाचा इतिहास मी जगलोच नाही. तो मी जगतही नाही...’

ग्रेस हे प्राचीनत्व स्वीकारतात, यामागे त्यांना वाटणारं अद्‌भुताचं आकर्षण आहे का? अनेकदा ते बाळमुठीचा उल्लेख करतात, लहान मुलाला असतं तशा कुतूहलातून ते असं म्हणतात का? पण त्यांनी स्वत:च भूतकाळाचा त्याग करणं ही माझी जीवनप्रेरणा नाही असं म्हटलं आहे. त्यामुळे तो त्यांच्या निर्मिती-विश्वाचा अंगभूत प्रदेश असावा, असं मानण्यास वाव आहे. आपल्या प्रतिमांविषयी त्यांनी म्हटलं आहे, ‘माझ्या काव्यात प्राचीन व मध्ययुगीन वातावरण व प्रतिमासृष्टी फिरून फिरून अवतरत असते, जसे– रथ, सारथी, घोडा, युद्धभूमी, खडावा, भोई, पालखी, जोगी, फकीर, --- वगैरे.’ ‘आपल्या व्यक्तिमत्त्वात मूलत: मेटॅफिजिकल व स्पिरिच्युअल पॅशन आहे,’ असं ते म्हणतात.

‘प्राचीन’ या संज्ञेकडे ‘शाश्वत’ या अर्थाने–दृष्टीने पाहता येईल का? ग्रेस यांच्या कविता आणि ललितबंधांतून जीवनाचं सातत्य आणि आदिमतेचं उच्चारण होताना दिसतं. त्यांची निर्मिती शाश्वत मूल्यांचा शोध घेताना दिसते. त्यांची भाषाही याला अनुसरूनच आहे. उदाहरणार्थ, काळाचे संदर्भ त्यांच्या ललितबंधांत चलित तारीख, कर, महिन्यांचे संदर्भ डोकावत असतीलही, पण प्रामुख्याने ऋतूंच्या अंगाने ते काळ मांडताना दिसतात. ‘वाऱ्याने हलते रान’ मधील ललितबंध हिवाळ्यापासून हिवाळ्यापर्यंत किंवा शिशिरापासून शिशिरापर्यंतचं आवर्तन पूर्ण करतात. तारीख, वार, महिना, वर्ष यांना भौतिक व तात्कालिक संदर्भ असतात, ऋतू परिवर्तन हे शाश्वततेचं निदर्शक आहे.

‘माझ्या भावनिर्मितीतील प्राचीन सभ्यतेच्या पाषाणलहरी’ या ललितबंधात त्यांनी म्हटलं आहे, ‘माझा नॉस्टेलजिया मला माझ्या मूठभर संसाराच्या, मिथिला, माधवी, राघव या त्रिवेणीत अडकलेल्या, राखरांगोळी झालेल्या, विस्कळीत झालेल्या निर्जन पठारावरच आणून सोडत नाही, तर तो मला माझ्या निर्मितीविश्वातील प्राचीन सभ्यतेच्या-असभ्यतेच्या, प्राचीन पाषाणलहरींपाशी आणून उभा करतो. ज्या छोट्या-मोठ्या संधी मिळतात, त्या सर्वांचा सदुपयोग, दुरुपयोग माझ्या भातुकलीतील तुटलेल्या, फुटलेल्या खेळण्याची डागडुजी करण्यात घालवतो.’



अनुक्रमणिका

या उद्‌धृतातील शेवटचे संदर्भ, ग्रेस यांच्या व्यक्तिगत जीवनाशी जसे आहेत, तसेच त्यांच्या निर्मिती-प्रक्रियेशी आहेत, 'कला ही जीवनाची पुनर्निर्मिती आहे' हा विचार या ललितबंधांमधून एका सूत्ररूपाने आला आहे. 'पुनर्निर्मिती हे फक्त कलेच्या क्षेत्रातील अंतिम वास्तव आहे आणि पुनर्निर्मितीही जीवनाचीच पुनर्निर्मिती असते. एवढे नक्की की तो जीवनाचा पुनर्विचार नसतो.' (पृ.८, वाऱ्याने हलते रान) असं ग्रेस यांनी म्हटलं आहे. नंतर त्यांनी म्हटलं आहे, 'कलावंत अतीव सावधानतेने जीवनाची पुनर्मांडणी करीत नसतो आणि पुनर्मांडणीच्या रूपाने तो जीवनाची नीतिसंपन्न मांडणीच केवळ करीत नसतो तर त्याची अंतिम सौंदर्यसंपन्नता प्रस्तावित करीत असतो. जीवनाला हा साक्षात्कारी चमत्कार कधीच साधत नसतो. पण अशा साक्षात्कारी चमत्कारांची मांडणी करीत जाणे, हेच तर कलेचे अधिष्ठान असते.' (पृ. ३७, वाऱ्याने हलते रान)

ग्रेस यांच्या मते, सौंदर्यसत्ता सर्वांत प्रभावी असते. सौंदर्यसत्तेच्या नंतर निसर्गसत्ता असते. त्यानंतर तिसऱ्या क्रमांकाची सत्ता ही जीवनसत्ता असते. जीवन आणि कला यातील अंतर स्पष्ट करताना ते म्हणतात, 'साक्षात कला ही कृतिशून्य असते पण कृतिवंतही असते. ती कलास्वादाची कृती असते. या संदर्भात 'वाऱ्याने हलते रान' मध्ये त्यांनी म्हटलं आहे. 'कला ही जीवनाची पुनर्निर्मिती आहे. थेट निर्मिती सदोष असणारच. पुनर्निर्मिती सदोष राहणार नाही, तर तिचा कल अपर्यायी परिपूर्णतेकडे झुकणारा असेल...... जीवन हे निर्माण आहे, निर्मिती नाहीच. पुनर्निर्मितीवर तर मुळीच नाही.'

जीवन आणि कला, निर्मिती आणि पुनर्निर्मिती या संबंधानं ग्रेस यांनी या संपूर्ण संग्रहात विस्तृत टिप्पणी केली आहे. अशी टिप्पणी करताना त्यांच्यातला टीकाकार-समीक्षक जागा होत असला, तरी ते मूलत: कलावंत आहेत. त्यांच्या ललितबंधांमध्ये निर्मितीविषयक भाष्य असलं, तरी त्यांची वीण नाजूक संवेदनेच्या हातांनी त्यांनी घातली आहे. हिवाळ्यात वाळून गेलेल्या बदामाची पानं घेऊन येणाऱ्या उद्यानतज्ज्ञ केशवशी या ललितबंधांमधून त्यांनी संवाद साधला आहे. दोघेही निर्मितीत गुंतलेले आहेत. या ललितबंधांमध्ये साऊलही सातत्याने डोकावते. तीच गोंदणगाव आहे. ती चित्रं काढते. या अर्थाने तीही निर्मितीमध्ये गुंतलेली आहे. ग्रेस यांची ही पात्रं प्रत्यक्षातली आहेत. त्यांच्यात त्यांची भावनिक गुंतवणूक आहे. पात्रांच्या पसाऱ्यात ग्रेस यांच्या साहित्यातून नेहमी भेटणारी सुमित्रा, लिली, मिथिला, माधवी, राघव, वेणू, वंदू अशी त्यांच्या भावबंधातील पात्रं आहेतच. या साऱ्यांमधून आपलं भावविश्व, निर्मितीविश्व, त्यातील गुंतागुंत ग्रेस टिपत जातात आणि त्यातून ...... अनुभूतीची निर्मिती करतात. निर्मितीचा वेध घेता घेता आणखी नवं निर्माण करण्याची ही कला केवळ ग्रेस यांचीच असू शकते, त्यांनाच ती साधू शकते!

◇◇◇

**मनोहर सोनवणे**
बी/६, श्रीदत्त अपा. माणिकबाग,
सिंहगड रस्ता, पुणे ४११०५१, मो. ९७६३३५८८९५

---

## १ एप्रिल २०१०पासूनचे आजीव सभासद

६४) औसरे शंकर देवराम, चिंचवड
६५) वाडारकर सांबाजी रामचंद्र, चिंचवड
६६) कोले सरोज प्रकाश, चिंचवड
६७) आपटे नुतन उदय, निगडी
६८) बेल्हेकर चंद्रकांत रामचंद्र, देहूरोड
६९) पालेकर विकास शिवाजी, रावेत
७०) शिंदे संतोष तुकाराम, रावेत
७१) वाबळे हनुमंत कृष्णा, चिंचवड
७२) रोकडे नंदकुमार कचेश्वर, चिंचवड
७६) नाईक मानसिंगराव, चिखली
७७) नाईक अमरसिंग, चिखली
७८) पाटील एस. आर., चिखली
७९) दुकळे पी. एम., चिखली
८०) हिरेमठ एम. एम., चिखली
८१) चिंदगे एस. पी., चिखली
८२) जोखे एन. व्ही, चिखली
८३) तडाखे डी. एच., मांगणे
८४) पाटील डी. आर., चिखली
८५) पाटील प्रविणसिंग, शिराळा
८६) पाटील संजय आत्माराम, इस्लामपूर
८७) पाटील आनंदा चंदु, कोकरूड

# वंदना विटणकर — भावगीताचा एक सुखद प्रवास!

– नंदा सुर्वे

असं म्हणतात की, एखाद्या कलाकाराचा मृत्यू होतो, तो त्याचा भौतिक मृत्यू असतो. पण त्याच्यातला कलाकार सदैव कलेच्या रूपात जिवंत असतो. कवयित्री, गीतकार वंदना विटणकर यांचं निधन झालं. पण त्यांची 'परीकथेतील राजकुमारा', 'शोधिसी मानवा राऊळी मंदिरी', 'रसिका मी कैसे गाऊ गीत', 'हा रुसवा सोड सखे, सोड हा बहाणा', 'हा छंद जिवाला लावी पिसे' अशी कितीतरी अवीट गोडीची गाणी त्यांच्यातला कलाकार आपल्या कलेच्या रूपात जिवंत असल्याची साक्ष देतात आणि रसिकजन वंदना विटणकरांना विसरू शकत नाहीत.

वंदनाताई जन्माने मुंबईच्याच– एका सजग घरात त्या वाढल्या. वडील इंजिनिअर, आई शिक्षिका. शिवाय आई गाणी, कविता रचायची. आईकडून आलेले सुंदर, भावपूर्ण शब्दांचे संस्कार वंदनाताईंच्या मनात रुजत गेले. त्यामुळे आईच गुरू आणि मैत्रीणही झाली. वंदनाताईंच्या लेखणीतून सुरुवातीला प्रेमकविता जन्माला आली. ते शब्द होते -

*'ओठावर नाचे भावफुलीचा झूला*
*नजरेची भाषा फितूर झाली मला.'*

शाळेत दहाव्या इयत्तेत शिकत असताना या कवितेचा जन्म झाला. ऐन नव्हाळीच्या वयात प्रेमकविताच लेखणीतून उमटणार. ही कविता शाळेच्या वार्षिक अंकात छापून आली आणि सर्वत्र कौतुकाचे गेंद फुलले. स्वत:मधल्या सर्जनशीलतेचा हा पहिला साक्षात्कार मनावर रेंगाळत राहिला. नंतर पुढे कवितेनं त्यांचा हात घट्टपणे धरला. मासिकांमधून कविता छापून यायला लागल्या. तो काळ मासिकांसाठी सुगीचा काळ होता. त्यामुळे कवयित्री म्हणून वंदना विटणकरांचं नाव ठसठशीतपणे नोंदलं जाऊ लागलं. पुढे आकाशवाणीवर अधिकृत कवयित्री म्हणून तिथल्या लिस्टवर त्या आल्या. त्यांच्या कविता तिथे गायल्या जाऊ लागल्या. त्या काळात त्यांचं कृष्णा कल्ले यांनी गायलेलं 'परीकथेतील राजकुमारा' हे गाणं खूप गाजलं. आजही एक अवीट गोडीचं गाणं म्हणून त्याचा उल्लेख केला जातो, ते गायलं जातं.

वंदना विटणकरांनी काही चित्रपटगीतंही लिहिली. 'आम्ही जातो आमुच्या गावा' या चित्रपटासाठी कमलाकर तोरणे यांनी त्यांच्या वहीतली एक कविता घेतली आणि त्याला सुंदर चाल लावून घेतली. 'उजळू स्मृती कशाला, अश्रूत दाटलेली...' हे ते गाणं खूप गाजलं; आणि त्याला महाराष्ट्र राज्य चित्रपट महामंडळाचं उत्कृष्ट गाण्याचं पारितोषिकही मिळालं. हा त्यांना मिळालेला पहिला आनंद. पुढे 'पारध', 'शूरा मी वंदिले', 'चोराच्या मनात चांदणे' या चित्रपटांमधल्या गाण्यांनाही चित्रपट महामंडळाची पारितोषिकं मिळून आनंदात सतत भरच पडत गेली.

'मनाचा उद्रेक म्हणजे कविता. ज्या भावना इतरांना सांगता येत नाहीत, पण कुठेतरी व्यक्त कराव्याशा वाटतात, त्या कवितेतून व्यक्त होतात.' वंदनाताईंनी हे विचार व्यक्त केले होते. कवितेतल्या कारागिरीसंदर्भात त्या एके ठिकाणी म्हणाल्या होत्या, "कधीतरी एखादी कल्पना सुचते. पण पुढे काहीच घडत नाही. अशा वेळी थोडी कारागिरी करून मुखडा, मग अंतरे असं गीत तयार होतं. आधी तयार केलेल्या चालीवर गीत लिहिणं हीसुद्धा कारागिरी असली, तरी ते एक आव्हानच असतं– शब्दसुरांचा तो छान खेळ असतो. चालीवर गाणी लिहिताना



अनुक्रमणिका

कवीच्या कल्पनास्वातंत्र्यावर थोडंसं बंधन येत असलं तरी मुळात प्रतिभा असावीच लागते, हे नाकारून चालणार नाही.

महंमद रफीसारख्या एका दिग्गज हिंदी गायकानं वंदनाताईंची आठ गाणी गायली, ही सुद्धा खूप अलौकिक गोष्ट झाली. तो योग जुळून आला संगीतकार श्रीकांत ठाकरे यांच्यामुळे! त्यांना एक भक्तिगीत करायचं होतं. त्यांना मनासारखं गाणं मिळत नव्हतं. श्रीकांत ठाकरेंनी त्यांना चालीवर नुसतं गुणगुणून दाखवलं, अर्थात् शब्दाविना. वंदनाताईंनी ती चाल पुन्हा पुन्हा ऐकली अन् शब्द बाहेर पडले.

*'शोधिसी मानवा राऊळी मंदिरी*
*नांदतो देव हा अपुल्या अंतरी'*

या ओळींवर श्रीकांतजी बेहद्द खूष झाले. पुढे शब्द उमटत गेले,

*'मेघ हे दाटती, कोठुनी अंबरी?*
*सूर येती कसे? वाजते बासरी?*
*रोमरोमी फुले, तीर्थ हे भूवरी*
*दूर इंद्रायणी, दूर ती पंढरी ।।'*

बघता बघता गाणं पूर्ण झालं. हे गीत गाताना महंमद रफींना 'ळ' उच्चारता येत नव्हता. त्यासाठी त्यांनी भरपूर सराव केला आणि अखेर ते जमलं, छानच जमलं. महंमद रफींनी मराठीत गायलेलं हे पहिलंच गाणं. पुढे त्यांनी वंदनाताईंची 'हे मना, आज कोणी बघ तुला साद घाली', 'हा रुसवा सोड सखे, पुरे हा बहाणा', 'अगं पोरी, संबाल दर्याला तुफान आयलंय भारी', 'दिनरात तुझा ग ध्यास गडे, हा छंद जिवाला लावी पिसे' अशी आठ गाणी गायली. आपल्या आवडत्या गायकानं आपली आठ गाणी गाणं हा वंदनाताईंना अनमोल ठेवा वाटला.

अरुण पौडवाल या संगीतकारानंही त्यांच्याकडे आवर्जून एक गीत मागितलं होतं. त्या वेळी त्यांचे पती हॉस्पिटलमध्ये होते. त्यामुळे त्यांनी आपल्याला जमणार नसल्याचं कळवलं. पण त्यांचा आग्रहच होता आणि वंदनाताईंना अचानक सुचलं– शब्द उमटले, 'रसिका मी कैसे गाऊ गीत?'

'आम्ही जातो आमच्या गावा' या चित्रपटासाठी अनुराधा पौडवाल यांच्या मधुर गळ्यातून हे गाणं गायलं गेलं. त्यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेचा उत्कृष्ट गेयरचनेचा ना. घ. देशपांडे पुरस्कार मिळाला होता.

अनेक प्रतिभावंत गायकांनी वंदनाताईंच्या शब्दांवर श्रुतिमधुर स्वरांचा वर्षाव केला. सुरेश वाडकर, हेमंतकुमार, मन्ना डे, रवींद्र साठे, अजित कडकडे, आशा भोसले, प्रभा अत्रे, देवकी पंडित, सुलोचना चव्हाण, शोभा गुर्टू असे अनेक नामवंत त्यात येतात.

वंदना विटणकरांनी बालसाहित्यातही मोठं काम केलंय. बालकथांची अनेक पुस्तकं, अनेक बालनाटकं त्यांनी लिहिली. 'सोनेरी शाई रूपेरी पान', 'परीकथेतील राजकुमार', 'बजरबट्टू', 'रॉबिनहूड' अशा काही नाटकांमधून शिवाजी साटम, विजय गोखले, अमिता खोपकर, अशोक समेळ हे कलावंत चमकले.

त्यांचे पती चंद्रकांत विटणकर हे उत्कृष्ट चित्रकार होते. ते बालनाट्यात नेपथ्याची जबाबदारी उचलत. त्यांची चांगली साथ मिळाली होती. पण ते अल्पायुषी ठरले. नंतरच्या एकाकी आयुष्यात त्यांना किशोर पनवेलकर भेटले. जीवनपटाचा दुसरा अंक त्यांच्या संगतीत चांगला रंगला. नेरूळजवळच्या 'आनंदाश्रम' या वृद्धाश्रमात दोघेजण एकमेकांच्या सोबतीनं राहात होते. अखेरीस मधुमेहाच्या विकारानं या गीतकार, कवयित्रीचा ७२ व्या वर्षी जीवनान्त झाला. त्यांच्या भावगीताचा अंत होणे नाही. ती काव्यसंपदा रसिकांसाठी मागे सोडून त्या गेल्या!

◇◇◇

**नंदा सुर्वे**
इ/१ अशोका पार्क, २७/३ हिंगणे खुर्द,
सिंहगड रोड, पुणे ४११०५१
फोन : २४३४९०८८



अनुक्रमणिका

## साहित्य — 'रत्नाकरा'ला अभिवादन!

– प्राचार्य डॉ. अनिल नागेश सहस्रबुद्धे

*कै. डॉ. र. बा. मंचरकर, मराठीचे प्राध्यापक पीएच्.डीचे मार्गदर्शक व प्रसिद्ध समीक्षक. संतवाङ्मयाचे व्यासंगी अभ्यासक, लेखक, अहमदनगरमधील तालुका पारनेर येथे जन्म ६ ऑक्टोबर १९४३ – देहावसान – ११फेब्रुवारी २०१२.*

*– संपादक*

प्रा. डॉ. रत्नाकर बाबुराव मंचरकर 'शब्दब्रह्मवासी' झाले, ही वार्ता कानावर आली तेव्हा क्षणात दुःख नाहीसे होऊन चिंतनमग्नता आली. असे व्यक्तिमत्त्व कधी पोकळी वगैरे निर्माण होऊच देत नाही. डॉ. मंचरकर यांचे पीएच.डीचे द्वादश विद्यार्थी, एम.फिलचे सतरा विद्यार्थी, अडोतीस वर्षांच्या रयत शिक्षण संस्थेतील त्यांचे असंख्य विद्यार्थी, नऊ ग्रंथ, चार सूत्रसंपादने, आठ संहिता संपादने आणि सव्वाचारशेच्यावर शोधनिबंध व विविध ग्रंथांतील त्यांचा सहभाग यांच्या स्वरूपात गुरुवर्य डॉ. र. बा. मंचरकर आपणास भेटतच राहणार आहेत.

पुणे विद्यापीठाच्याच नव्हे तर महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांमध्ये आणि संशोधन व अभ्यासकेंद्रामध्ये डॉ. मंचरकरांची जरब होती. चिकित्सक व साक्षेपी अभ्यासक, समीक्षक आणि संशोधक या दृष्टीने मराठीच्या प्राध्यपकांमध्ये त्यांचा आदरयुक्त धाक होता. त्यांच्यातील शिस्तशीर आणि मार्गदर्शक प्राध्यापकाला सारेच नम्रतेने अभिवदन करीत. बोलताना, आणि शिकविताना नेहमीच साधार विवेचन, स्पष्टीकरणे, निवेदन, विश्लेषण करावे; हा त्यांचा शिरस्ता होता. पूर्वतयारीशिवाय आणि हातात संदर्भाची टिपणे ठेवल्याशिवाय ते कधीच विषयाची मांडणी करीत नसत. प्रकट वाचन, अभिवाचन आणि व्याख्यान यांत सूत्रबद्धता, नेटकेपणा आणि व्याख्यात्मकता राखूनच ते विषय मांडीत. त्यामुळे त्यांच्या अभ्यासमूलक व्याख्यांनाना प्रवचनांचा दर्जा प्राप्त होई. स्पष्ट आणि खणखणीत आवाज, वाचता बोलताना आवश्यक तेवढी लय आणि गती राखण्याचा त्यांचा स्वभाव होता त्यांच्या उपस्थितीत विषय मांडताना, प्राध्यापक अतिशय सावधगिरीने विषय मांडीत. डॉ. मंचरकर चर्चासत्रांचे बीज भाषण करू लागले की सहभागी प्राध्यापक अतिशय सावधगिरीने आणि लक्षपूर्वक टिपणे काढू लागत. मुद्देसूदपणा, सूत्रबद्धता, संदर्भमूलकता, तर्कशुद्धता आणि स्पष्टता हे त्यांच्या व्याख्यान विवेचनाचे पैलू सर्वच अभ्यासकांना नेहमीच अनुकरणीय वाटत आले आहेत. त्यांच्या लेखन, व्याख्यानाची भाषा काहीशी शब्दबंबाळ वाटली तरी; पारिभाषिक शब्दांचा व्याख्यात्मक मांडणीसाठी उपयोग आणि प्रगल्भ अलंकृत भाषिक आविष्कार गंभीर आणि वेधक लयीत अनुभवताना वाचक आणि श्रोते मंत्रमुग्ध होत असत.



'वक्ता दशसहस्रेषु' असे म्हणतात. त्यांची प्रचीती मंचरकरांचे व्याख्यान ऐकताना येई. ओघ, लयबद्ध वक्तव्य, व्यासंगाची वचनातून सतत प्रत्ययास येणारी व्यापकता, आवाजातील धारदार गंभीरता आणि काव्यात्म संदर्भांची योजकता यामुळे सभा मंत्रमुग्ध होई. व्याख्यान आणि अभिवाचन यातील भिन्नता मावळल्याचा अनुभव येई. त्यांचे व्याख्यान हे प्रबंधनाचे नाट्यमय आविष्करण असे. साहित्यिक, सामाजिक आणि आध्यात्मिक विषयांवर महाराष्ट्रात आणि बाहेर पाच हजारांहून



अनुक्रमणिका

अधिक व्याख्याने या वाचस्पतीने सादर केली आहेत.

डॉ. र. बा. मंचरकर यांचा वारसा तेवढ्याच ताकदीने पुढे नेण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्यांच्या कन्या प्रा. (डॉ.) (सौ.) वैशाली भालसिंग यांनी मंचरकरांच्या समीक्षालेखनाचा समग्र परामर्श घेताना; मंचरकरांच्या बहुक्षेत्रीय लेखनाकडे लक्ष वेधले आहे. ज्ञानेश्वरी-अध्यायांची संपादने, ज्ञानदेवांचा तत्त्वविचार, ज्ञानदेवीचे लावण्य, नामदेवी कवितेतील नवता, एकनाथांच्या वाङ्मयाचा ज्ञानेश्वर आणि मुक्तेश्वर यांच्या संदर्भात तुलनात्मक विचार, संतसाहित्याच्या समीक्षेचा साक्षेपाने केलेला पुनर्विचार, संतांच्या सामाजिक कार्याचे ऐतिहासिक महत्त्व, संतांनी इस्लामी राजवटीवर व्यक्त केलेली, प्रतिक्रिया संतांच्या विचारांची कालातीत प्रस्तुतता, या सर्व संदर्भाने मंचरकरांनी संतवाङ्मयाचे साक्षेपाने परिशीलन केले आहे. पंडित किंवा आख्यान कवींच्या पंरपरेचे स्वरूप समालोचन करून त्यांनी अभिजातवादी कलादृष्टीच्या प्रकाशात पंडितांच्या वाङ्मयाची उकल करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचबरोबर ज्ञानदेवांचा पंडिती-परंपरेवरील प्रभाव स्पष्ट केला आहे. पंडिती परंपरेतील मुक्तेश्वर यांच्या काव्याचा सर्वांगपरिपूर्ण अभ्यास हे डॉ. मंचरकरांचे या अभ्यासक्षेत्रातील महत्त्वाचे कार्य होय. विविध धर्मसंप्रदायांच्या आश्रयाने किंवा परंपरेत निर्माण झालेल्या वाङ्मयाचा अभ्यास करून मध्ययुगीन वाङ्मयाभ्यासाचे दालन परिपुष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. यापैकी 'वीरशैव-संप्रदाया'चे संपादन महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या जडणघडणीची उकल होण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. 'धर्मसंप्रदाय आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मय' हा त्यांचा ग्रंथ, धर्मसंप्रदायांच्या अनुषंगाने निर्माण झालेल्या साहित्याभ्यासाचा वस्तुपाठ आहे.

समीक्षेच्या प्रांतातील मध्ययुगीन मराठी वाङ्मय-समीक्षेविषयी त्यांचे कार्य जसे, अभ्यासकांच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. तसेच 'साहित्यिक भूगोल' ही समीक्षेच्या क्षेत्रात, सर्वथा वैशिष्ट्यपूर्ण आणि नवी संकल्पना म्हणता येते. वाङ्मयाचा अभ्यास माणसाच्या अस्तित्वरूपाचे परिसर, पर्यावरण, पूर्वसंस्कार इ. संदर्भात वैशिष्ट्यपूर्ण असे दर्शन घडवितो, हे त्यांनी स्पष्ट करून 'साहित्यिक प्रादेशिकता' या पेक्षा 'साहित्यिक भूगोल' अशी व्यापक भूमिका घेऊन साहित्याचे अवलोकन व आकलन करण्याचा प्रयत्न केला.

वाङ्मयाचा इतिहास, तौलनिक साहित्य-सैद्धांतिक चर्चा, कवी आणि कविता, कथा आणि कथाकार, कादंबरी आणि कादंबरीकार चरित्र-आत्मचरित्र-प्रवासवर्णन, मराठी वाङ्मयातील नवप्रवाह, मध्ययुगीन आणि नवे प्रवाह, परिवतर्नवादी साहित्यप्रवाह, या संदर्भाने सर्व स्तरांवरील अभ्यासकांसाठी सैद्धांतिक उपयोजित स्वरूपात चर्चा केली आहे.

समीक्षाशास्त्राच्या संदर्भात समीक्षकांचा परिचयात्मक परामर्श, समीक्षेचे विविध मार्ग किंवा पद्धती, समीक्षापद्धतींचे वर्गीकरण इ. संदर्भात विद्यार्थ्यांना, नवसंशोधकांना उपयुक्त असे लेखन त्यांनी केले.

साहित्यशास्त्राच्या क्षेत्रात संस्कृत काव्यशास्त्र, साहित्य प्रकारांची संकल्पना, संहिता चिकित्सा, साहित्य संशोधन आणि साहित्याचे अध्यापन या संदर्भात त्यांनी केलेले लेखन; साहित्याचे आकलन अभ्यासकांसाठी उपयुक्त आहे.

बहुशाखान्वित आणि गतिशील क्षेत्र म्हणून ते भाषाविज्ञानाकडे पाहात असत. मराठी भाषेविषयी विविध, भाषिक, प्रादेशिक, सामाजिक आणि राजकीय स्वरूपातील संदर्भांचे चिंतन त्यांनी वेळोवेळी प्रकट केले आहे.

ह्या 'साहित्य रत्नाकरास' अभिवादन!

◇◇◇

**प्राचार्य डॉ. अनिल नागेश सहस्रबुद्धे**
'आई' समर्थनगर, श्रीराम चौक,
पाईपलाईन रोड, अहमदनगर ४१४००३
(०२४१) २४२४१६७ आणि ९८८१५००९४२



अनुक्रमणिका

# ब्रीद तुझे जगी — दीनानाथ

(दीनानाथ मंगेशकर यांचे साहित्यिक चरित्र)

– सौ. वंदना रवींद्र घांगुर्डे

संगीताच्या मैफलीत गायक कलाकाराला रसिकांच्या आशीर्वादाचे म्हणजेच मैफलीच्या यशस्वितेचे दडपण असते! दीनानाथांचा हा चरित्रग्रंथ म्हणजे एक शब्दमैफलच आहे, ती सादर करत असताना मात्र लेखिकेसमोर कोणत्याही प्रकारचे दडपण असल्याचे जाणवत नाही. उलट अभ्यासातून, परिश्रमातून, मिळालेला आत्मविश्वासच या शब्दमैफलीत पदोपदी आढळला! मला मात्र या मैफलीचा एक श्रोता, वाचक व समीक्षक या तिहेरी भूमिकेतून प्रचंड दडपण जाणवते आहे!

मुखपृष्ठावरील चरित्रकाराची प्रसन्न मुद्रा ही ग्रंथाच्या स्टॉलचे संदर्भात एकदम महत्त्वांची गोष्ट होय! ग्रंथ हाती घेतला वाचण्यासाठी, पण त्याच्यातील दुर्मीळ छायाचित्रांमध्ये गुंतून पडलो! पुन्हा पुन्हा छायाचित्रे पाहाण्याचा मोह होत होता, वाचनासाठी मानसिकताच तयार होत नव्हती! पण मनोनिग्रह करून लेखिकेच्या मनोगताने वाचन सुरू केले! मनोगतात या चरित्रग्रंथाचे प्रयोजन, त्याच्या लेखनामागची प्रेरणा, पार्श्वभूमी अतिशय प्रभावीपणे व्यक्त झाली आहे. ज्यांचे ज्यांचे साहाय्य लाभल्यामुळे, मार्गदर्शन मिळाल्यामुळे हे महान कार्य आपल्या हातून होऊ शकले, त्या सर्वांचा लेखिकेने कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला आहे!

दीनानाथांचे आत्मनिवेदन — माझ्या आवडत्या भूमिका हा लेख या चरित्रग्रंथातील सर्वांत महत्त्वाचा आहे असे मला वाटते. या निवेदनात दीनानाथांनी स्त्री-पुरुषांच्या भूमिकांबद्दल आपले मत अगदी स्पष्ट शब्दांत मांडले आहे. त्यात कोणत्याही प्रकारचा व्यक्तिद्वेष, अहंकार, खोटी प्रतिष्ठा, पूर्वग्रह नसून त्याच्यातून व्यक्त होते ती रंगभूमीविषयीची तळमळ, निष्ठा!

दीनानाथांच्या चरित्र तपशीलात गोमंतकाची कलासंपन्न भूमी, तेथील मातीतच कलागुण रुजण्याची वैशिष्ट्ये या सर्व गोष्टी लेखिकेने नियोजनपूर्वक वाचकांसमोर ठेवल्या आहेत.

नाटक, नाट्यसंगीत, संगीत नाटक, संस्कृती या शब्दांचा जो विस्तृत ऊहापोह केला आहे, त्यामुळे या ग्रंथाचा शब्दसागर अतिशय विशाल, अथांग असा झाला आहे! दीनानाथांची संगीताची उपासना म्हणजे मंगेशाच्या मंदिरात भक्तांना गाणी म्हणून दाखवणे!

हाच बालकलाकार पुढे १३ वर्षांचा झाल्यावर काळी ५ या पट्टीत, अन् तेही त्या पट्टीच्या मध्यमांत, ठुमरी म्हणत असत; अन् तिला अनेक वन्समोअर घेत असत. त्यावेळी त्यांना रसिकांचे कौतुक, भावना, नुसत्या कल्पनेनेच डोळ्यांपुढे आणता येतात.

दीनानाथांच्या आवाजात, गायकीत आक्रमकता होती, त्यामुळे धैर्यधराच्या पदांना न्याय मिळाला, तर सुलोचना, तेजस्विनीची पदे संन्यस्त खड्ग, रणदुंदुभी या नाटकांच्या यशस्वितेत निर्णायक ठरली! या आक्रमकतेला त्यांच्यातील प्रयोगशीलतेची जोड मिळाल्यामुळे त्यांच्या गळ्यातून बाहेर पडलेले प्रत्येक पद हे रसिकांच्या थेट हृदयाला जाऊन भिडे! प्रचलित रागाचे स्वरूप ते आपल्या वेगळ्या अंदाज़ाने सादर करीत!

लहानपणी ब्रह्मवृंदांचे स्पष्ट वेदमंत्र — त्यांचे उच्चार कानावर पडल्यामुळे दीनानाथांचे शब्दोच्चार, स्वरांचा लगाव अगदी स्पष्ट, खणखणीत होता!



अनुक्रमणिका

त्यामुळे खाडिलकर, गडकरी, स्वातंत्र्यवीर सावरकर, वीर वामनराव जोशी यांसारख्या दिग्गजांच्या पद्यरचनेस न्याय मिळाला!

दीनानाथांची प्रयोगशीलता, नावीन्याची हौस, पारंपरिक बंदिशीचे काळानुरूप नवे वळण, त्यावरील चाली या सर्व गोष्टी वझेबुवा संगीत दिग्दर्शक असताना-सुद्धा 'रणदुंदुभी'मध्ये समाविष्ट करण्यात आल्या. बुवांचा योग्य तो आदर त्यांच्याच बंदिशींना आपल्या मुशीत बसवून दीनानाथांनी 'रणदुंदुभीचे' संगीत हे बलवंत संगीत मंडळीचे अभिमानास्पद बलस्थान बनवले. त्यावेळी झालेल्या चर्चेत, आपल्याच बंदिशी नवीन स्वरूपांत ऐकून, वझेबुवा आश्चर्यचकित होत होते!

मंगेशकर परिवारातील कलाकार, शिवाय गणपतराव मोहिते (मा. अविनाश), डॉ. प्रभाकर जठार, डॉ. वसंतराव देशपांडे, छोटा गंधर्व, अभिषेकीबुवा आणि घांगुर्डे दांपत्य असा मंगेशकरी गानविद्येचा तेजस्वी ओघ व्यक्तिगत वैशिष्ट्यांसह वर्णन करून पर्यायाने दीनानाथांच्या गानकौशल्याची महतीच वाचकांना सादर केली आहे. त्यातील मा. अविनाश यांचा अभिनय व गायन आम्हांला 'कुलवधू' मध्ये अनुभवता आले. 'कट्यार' मध्ये वसंतराव देशपांडे व अभिषेकी यांचा कलाविष्कार अनुभवला, तर घांगुर्डे दांपत्याची गायन व अभिनयातील घोडदौड आम्ही प्रतिवर्षी होणाऱ्या संगीत-नाट्य महोत्सवात प्रत्यक्ष अनुभवत आहोत. उगमच जोरदार असल्यामुळे हा मंगेशकरी पंथ उत्तरोत्तर जास्तच प्रभावी होत जाणार यात शंका नाही!

दीनानाथांनी अवघ्या ३ वर्षांच्या अल्पकाळात ज्योतिषशास्त्राचा सखोल अभ्यास करून त्या शास्त्रातील एक अधिकारी व्यक्ती म्हणून नावलौकिक संपादन केला! मूळ प्रयोगशील स्वभाव व नावीन्याची आवड या नैसर्गिक गुणसंपन्नतेतून त्यांनी गायन व ज्योतिषशास्त्राची सुंदर सांगड घातली!

**'ज्योतिष आणि संगीत'**— या विषयावरील ग्रंथलेखनास त्यांनी प्रारंभ केला होता, पण दुर्दैवाने ते हस्तलिखितच गहाळ झाल्याने अत्यंत मौलिक अशा विचारधनास संगीतरसिक मुकले!

या ग्रंथात गायनाचा व ग्रहांचा संबंध कसा आहे यावर शास्त्रशुद्ध रीतीने आपले मत मांडले होते. कोणता ग्रह कोणत्या स्वराचा स्वामी, राग-रागिण्यांचे रंग, स्वरांच्या रंगांवरून त्यांचा निसर्गातील सूर्यकिरणांतील रंगांशी, वेळेशी कसा संबंध लागतो? इत्यादी विषयांवरील निष्कर्ष अचूक पद्धतीने काढून त्यांनी फार मोठे ऐतिहासिक कार्य केले होते, हे निष्कर्ष संगीतरसिकांपुढे येऊ शकले नाहीत, ही खंत दीनानाथांना संपूर्ण हयातभर वाटत असे! त्यांनी केलेली भाकिते, भविष्ये अचूकपणे खरी ठरत. अनेक दिग्गजांना याची प्रचीती आली!

कंपनीस दररोज उत्पन्न किती होईल, याचा अंदाज ते अगोदरच सांगत आणि तो दररोज अचूक ठरे! तुकोजीराव होळकरांना, राजसंन्यास करावा लागेल हे भाकित जन्मकुंडलीवरून मांडले होते; ते पुढे खरे ठरले!

अशा या थोर सरस्वतीपुत्रास, महान संगीत दिग्दर्शकास, निष्ठावान रंगभूमीच्या उपासकास अवघे ४२ वर्षांचे अल्पायुष्य लाभावे, हे किती विचित्र? मंगेशकर परिवाराचे, मराठी संगीत नाटक, रंगभूमी ह्या सर्वांचेच दुर्दैव!

५ नोव्हेंबर १८४३ ते २०११ असा १६८ वर्षांचा प्रदीर्घ कालावधी या चरित्रग्रंथात आलाय! त्यापैकी दीनानाथांचे आयुष्य ४२ वर्षे आणि रंगभूमीवरील कारकीर्द अवघ्या तीन दशकांची, पण त्यांचे कार्य मात्र युगप्रवर्तक!

◇◇◇

**नीलकंठ वासुदेव देशपांडे**
१/११ अबोली अपार्टमेंट, नवनगर विकास, प्राधिकरण,
सिंधूनगर, निगडी, पुणे – ४११०४४

पंच्याहत्तरीत पदार्पण केलेल्या, साहित्य परिषदेच्या दोन जाणत्या कार्यकर्त्यांचे, अभीष्ट चिंतन!

## सर्जनशील कार्यकर्ता – राजेन्द्र बनहट्टी

– प्रा. मिलिंद जोशी

चार दशकांहून अधिक काळ कथा, दीर्घकथा, कादंबरी, नाटक, प्रवासवर्णन, व्यक्तिचित्रे यांसारख्या लेखनप्रकारांत आपल्या लेखणीचा ठसा उमटविण्याचे काम राजेंद्र बनहट्टी यांनी केले आहे. १९६० नंतर मराठी साहित्य खऱ्या अर्थाने बहरले. स्वातंत्र्योत्तर कालखंडात सर्वच पातळ्यांवर अपेक्षाभंग वाट्याला येत होता. एकीकडे टोकाचा आदर्शवाद आणि दुसरीकडे कोसळत जाणारी मूल्यव्यवस्था यांना जोडणाऱ्या तकलादू पुलावर त्यावेळची पिढी उभी होती. यंत्रयुगामुळे आलेली गतिमानता, सामाजिक आणि वैयक्तिक पातळीवर अनुत्तरीत राहिलेले प्रश्न, कुटुंबांचे विभक्त होणे; आणि माणसामाणसांतील उसवत जाणारी वीण, वैचारिक आणि मानसिक कोलाहलात होणारी घुसमट, जुने सोडता येत नाही आणि नवे स्वीकारता येत नाही अशा संभ्रमात सापडलेली माणसे या साऱ्या गोष्टींना आपल्या लेखणीत समर्थपणे पकडणाऱ्या मोजक्या लेखकांमध्ये राजेंद्र बनहट्टी यांचे नाव अग्रस्थानी आहे.

१९५६ मध्ये राजाराम वाचनालयाने आयोजित केलेल्या कथास्पर्धेसाठी 'पिता' ही कथा बनहट्टींनी लिहिली. त्या कथेला प्रथम पारितोषिक मिळाले आणि त्यांचा कथालेखक म्हणून प्रवास सुरू झाला. समानधर्मा, खेळ, आंत्याची सावली, गंगार्पण, अवेळ, कृष्णजन्म, लांडगा, युद्धपर्व, प्रेक्षक, मध्यंतर या त्यांच्या कथासंग्रहांनी कथालेखक म्हणून त्यांचे वेगळेपण सिद्ध केले. अपूर्णा, अखेरचे आत्मचरित्र, मरणानंतरचे मरण या त्यांच्या कादंबऱ्यांनी खूप वेगळे विषय हाताळले. 'जीवन त्यांना कळले हो,' 'माणूस म्हणतो माझे घर' ही दोन नाटकेही त्यांनी लिहिली.



दीर्घकथा ही बनहट्टींची खासियत. त्यांच्या कथा व्यक्तिकेंद्री आहेत. व्यक्ती आणि त्याचा भवताल यातील सूक्ष्मातिसूक्ष्म स्पंदने टिपण्याचे कसब त्यांच्या लेखणीत आहे. मानवी जीवनाचे, नातेसंबंधांचे अनेक अदृश्य पदर त्यांच्या कथांमधून उलगडत जातात आणि वाचक त्या भावविश्वाशी जोडला जातो. बनहट्टींची स्वत:ची अशी खास निवेदनशैली आहे. कृष्णजन्म, खेळ, सुरुवात, शेजारी यांसारख्या त्यांच्या कथांचे इंग्रजी, गुजराती आणि हिंदी भाषांमध्ये अनुवाद झाले आहेत.

अनेकदा सर्जनशील लेखक साहित्यसंस्थांवर कार्यकर्ता म्हणून काम करण्यासाठी तयार नसतात; कारण अशा कामासाठी खूप वेळ द्यावा लागतो. पण बनहट्टींचे वेगळेपण असे की, स्वत:तील सर्जनशीलता जपताना त्यांनी कार्यकर्ता म्हणूनही मोठे योगदान दिले आहे. १९८५ ते १९९२ या काळात ते महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष होते. १९९५ ते ९८ या काळात अध्यक्ष होते. १९८८ ते १९९२ या काळात ते अखिल भारतीय मराठी साहित्य मंडळाचे अध्यक्ष होते. २००२ साली पुणे येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. सर्जनशील कार्यकर्ता असाच त्यांचा उल्लेख करावा लागेल. लेखक आणि कार्यकर्ता या दोन्ही भूमिका पार पाडताना त्यांनी कधीही तत्त्वांशी प्रतारणा केली नाही. साहित्य परिषदेच्या निष्ठावान कार्यकर्त्यांच्या मांदियाळीतही बनहट्टींचे नाव वरच्या स्थानावर आहे.

सर्जनाचा संसार करताना साहित्य संस्थांचा कारभारही तितक्याच मनोभावे सांभाळणाऱ्या या सर्जनशील कार्यकर्त्याला परमेश्वराने दीर्घायुरारोग्य द्यावे हीच त्याच्याकडे प्रार्थना.

◇◇◇

**प्रा. मिलिंद जोशी.**
बी१/१२, रविराज टेरेस, सुखसागरनगर,
कात्रज, पुणे- ४११ ०४६.



अनुक्रमणिका






अभीष्ट चिंतन!

## सदाहरित राजाभाऊ!

– रविप्रकाश कुलकर्णी

गोविंद दिगंबर फडणीस तथा राजाभाऊ फडणीस यांच्या अमृतमहोत्सवी सोहळ्याचं आमंत्रण आलं तेव्हा क्षणभर वाटलं, हे गोविंद फडणीस दुसरे कुठले तरी असणार, पण पत्रिकेवरच राजाभाऊंचा पगडीधारी पण टायबीय लावलेला फोटो. त्यामुळे संशयाला जागा नव्हती. मग वाटलं तारखेत तर काही घोटाळा झाला नाही ना?

जो माणूस आजही चाकरमान्यासारखा बरोब्बर अकरा वाजता स्वत:च्या ऑफिसात जाऊन सेल्सटॅक्सविषयक कामाचा फडशा पाडत असतो, राजाभाऊंनी केस हातात घेतली; की ते जिंकणारच असा ज्यांचा लौकिक आहे, त्याला अपवाद म्हणून देखील उदाहरण नाही. म्हणून त्यांच्याकडे येणाऱ्या ग्राहकांची कमी नाही. दिवसभर हा उपसा केल्यानंतर माणूस थकून जाईल की नाही? माणूस घरी येऊन जरा निवांत बसेल की नाही? तर हा माणूस निघे साहित्य परिषदेच्या दिशेने– चालत! साहित्य परिषदेच्या नव्या घटनेचा हा शिल्पकार. भले आता कार्यकारिणीत नसेल पण अजूनही परिषदेत 'गोष्टी सांगेन युक्तीच्या चार' साठी ते हवेच असतात. एकेकाळी राजाभाऊंची 'विशाखा प्रकाशन' संस्था होती. दीडदोनशे पुस्तकं त्यांनी प्रकाशित केली. 'विशाखा' मासिक चालवलं. असा हा माणूस पंचाहत्तरीचा असू शकतो काय? फार तर राजाभाऊ फडणीस यांचं कागदोपत्री वय पंचाहत्तर झालं असं म्हणावं लागेल. ही किमया राजाभाऊंना साधली असेल?



मुळात हा माणूस तसा मितभाषीच. बोलणार तर एखादंच मार्मिक वाक्य बोलणार, आयुष्यातील चढ-उतारांबरोबरच उन्मळून जावं असे प्रसंग वाट्याला येऊनसुद्धा हा माणूस एवढा ताठ-ठणठणीत, जणू काही घडलंच नाही!

पं. रामाचार्य अवधानी, तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक, लेखक-संपादक असलेल्यांचा गोविंद अवधानी हा थोरला मुलगा, पण दत्तक गेल्याने तो फडणीस झाला. राजाभाऊंनी मॅट्रिक झाल्या झाल्या 'साहित्य विशाखा' दिवाळी अंक काढला होता. ज्यात त्यांच्या कथेबरोबरच रा. ग. हर्षे, लोककवी मनमोहन आणि अजून फारसे नाव न झालेले पु. ल. देशपांडे, व्यंगचित्रकार मंगेश तेंडुलकर यांच्यासारख्या मंडळींचं साहित्य होतं.

पण या साहित्यसेवेने घडलं भलतंच. वडिलांनी दम भरला, "एक तर धंदा तरी करा नाहीतर शिक्षण तरी पूर्ण करा." राजाभाऊंनी दुसरा पर्याय स्वीकारला. ते व्यवस्थित बी.कॉम. झाले. प्रथेप्रमाणे आधी लोअर डिव्हिजनल क्लार्क, त्यानंतर सेल्सटॅक्स इन्स्पेक्टरदेखील झाले. पण पैसे खाता येत नसल्याने त्यांनी चक्क नोकरी सोडण्याचा निर्णय घेतला आणि – सेल्सटॅक्स प्रॅक्टिस सुरू केली. पुढे जनरीतीप्रमाणे लग्नही झालं आणि राजा-राणी सुखाने मुलाबाळांसह नांदू लागले असं असायला काहीच हरकत नव्हती.

पण इथंच राजाभाऊंचं वेगळेपण सुरू झालं. १९५४ ला एक दिवाळी अंक काढून त्यांनी तो नंतर बंद केला



अनुक्रमणिका



होता. ते वेड पुन्हा जागं झालं आणि १९६५ ला त्यांनी नव्याने 'विशाखा' अंक सुरू केला! तो वाचकांच्या पसंतीला देखील उतरला.

दरम्यान राजाभाऊंच्या आयुष्यात आणखी एक पर्व सुरू झालं. ते आपल्या चुलत सासऱ्यांच्या म्हणजे इचलकरंजीच्या फ्युअल इंजेक्शन इक्विपमेंटमध्ये रुजू झाले. तिथे बरीच भवती न भवती आणि मन:स्तापाचे धनी होत असतानाच राजाभाऊंनी पुढे स्वत:च एक 'सुफला' ऑइल इंजिन तयार केलं; आणि तो व्यवसायही उत्तम केला.

पण मंदीची लाट आली. ऑइल इंजिनची मागणी घटली...

एका रात्रीत राजाभाऊंनी इचलकरंजी सोडली व ते पुण्याला आले आणि विशाखा प्रकाशन सुरू केलं! तोपर्यंत विशाखा दिवाळी अंक प्रस्थापित झाला असल्यामुळे लेखक मंडळींशी संबंध होतेच. मराठीतील अत्यंत नामवंत लेखकांचे प्रामुख्याने कथासंग्रहच काढले कारण राजाभाऊ स्वत: कथांचे 'फॅन' आहेत. आजही राजाभाऊ दर दिवाळीला पदरमोड करून पन्नास-साठ दिवाळी अंक विकत घेतात, त्यांतल्या कथा वाचतात; आणि त्यांबद्दल आपलं मत मांडतात, जे बनहट्टींसारख्या मनस्वी लेखकाला पण पटतं हे विशेष.

पण एवढं सगळं असताना एके दिवशी राजाभाऊंनी विशाखाचा कारभार बंद केला. याचं कारण राजाभाऊंची शिस्त! राजाभाऊंचे सगळे हिशेब 'ऑन पेपर' ठेवण्याची त्यांची सवय आहे. रोजकिर्दीची डावी बाजू-उजवी बाजू सांभाळायच्या हा तर त्यांच्या व्यवसायाचा बीजमंत्र आहे.

मात्र यामुळे एक घडलं, राजा फडणीसांचं पाऊल साहित्य परिषदेत पडलं; आणि पुढे ते कायमचं ठरलं.

'विशाखा' बंद केल्यानंतर राजाभाऊंच्या बैठका केशवराव कोठावळे, ग. वा. बेहेरे अशा मंडळींत होऊ लागल्या. या अशा साहित्यिक मंडळींच्यामुळे ते साहित्य परिषदेत जाऊ लागले. निवडणुकीत भाग घेऊ लागले. पहिल्यांदा राजाभाऊ निवडणुकीत पडले पण पुढे ते संस्थेत इतके मुरले की बिनविरोध निवडून आले, कोषाध्यक्ष झाले.

कोषाध्यक्ष झाल्यानंतर राजाभाऊंनी सर्वप्रथम काय केलं असेल, तर संस्थेचा स्थिर निधी वाढविण्याचे उपाय शोधले. आजीव सभासद वाढवणे, परिषदेचा हॉल भाड्याने देणे, म.सा.प. पत्रिकेसाठी जाहिराती वाढवणे, अशा तऱ्हेने राजाभाऊ म.सा.प. मध्ये दिवसेंदिवस जास्तच गुंतत गेले. तेव्हा परिषदेचं अध्यक्षपद निवडणुकीतून मिळायचं. राजाभाऊंनी ते निवडणुकीतून 'बाहेर' काढलं. त्यामुळेच ग. वा. बेहेरे, राजेंद्र बनहट्टी कार्याध्यक्ष होताच राजाभाऊ परिषदेच्या कामात अधिकाधिक गुंतत गेले. विविध योजना, उपक्रम घडत गेले. उदाहरणार्थ, विभागीय साहित्य संमेलनाची परंपरा खंडित झाली होती ती सुरू केली. गरजू साहित्यिकांना दरमहा थोडे का होईना मानधन देण्याची योजना ही कल्पना राजाभाऊंनाच सुचली. त्यासाठी मग शंकर पाटील, राजेंद्र बनहट्टी यांनी मदतीचा हात पुढे केला. याबद्दल परिषदेने राजाभाऊंच्या अभिनंदनाचा ठराव केला.

या काळातील आणखी एक विशेष घटना म्हणजे घटनेत कालौघात ज्या त्रुटी आढळल्या, जाणवल्या त्या लक्षात घेऊन केलेली नवीन घटना. त्याचे श्रेय सर्वस्वी राजाभाऊंकडेच जाते. आज असलेल्या घटनेचा शिल्पकार म्हणून काहीजण राजाभाऊंना म्हणतात, तेव्हा राजाभाऊ हा सन्मान नम्रपणे स्वीकारतात. १९९५ ते १९९८ आणि १९९८ ते २००१ व नंतर २००६ ते २०११ राजाभाऊ परिषदेच्या कामात सक्रिय राहिले. २०११ मध्ये जेव्हा ते कार्यकारी

विश्वस्तपदावरून पायउतार झाले तेव्हा संस्थेचा ताळेबंद सुमारे दीडकोटीचा झाला व वार्षिक उत्पन्न २० लाखांच्यावर गेले. ही संस्थेच्या प्रगतीचीच एक खूण होती. त्यात अर्थात राजाभाऊंचा हातभार निर्विवाद.

साहित्य परिषद ही राजाभाऊंच्या आयुष्याची इतकी अविभाज्य गोष्ट झाली की जणू हे दुसरं घरच! त्यांच्याच शब्दात सांगायचं तर, 'शेवटी म.सा.प. ही माझी संस्था आहे. माझ्या व्यक्तिमत्त्व विकासात या संस्थेचा मोठा वाटा आहे. त्यामुळे या संस्थेच्या हिताकरताच मी कायम झटेन. भले मग कार्यकारिणीत असो वा नसो. एक कार्यकर्ता म्हणून माझी ही भूमिका कायम असेल.'

राजाभाऊ फडणीस या यांचं स्वच्छ चित्र वरील विचारात दिसतं; आणि तेच त्यांच्या चिरतरुणपणाचं रहस्य असावं.

◇◇◇

**रविप्रकाश कुलकर्णी**
३, स्वप्नसाकार,
ध. वां. चौधरी हायस्कूलजवळ, डोंबिवली (पूर्व)
पिनकोड ४२१२०१. मोबाईल ९२२४८७२८७०

---

## १ एप्रिल २०१०पासूनचे आजीव सभासद

८८) परीट बाबासाहेब अण्णा, बिलाशी
८९) कुंभार अशोक मारुती, कातोळी
९०) घोडे संजय चंद्रकांत, कोकरूड
९१) ऊथले सुजाता शामराव, कोकरूड
९२) गायकवाड दिलीप, शिराळा
९३) भालेकर संतोष, शिराळा
९४) पाटील वसंत तुकाराम, शिराळा
९५) नलावडे सुभाष शंकर, शिराळा
९६) पाटील इंदुताई भिमराव, शिराळा
९७) जोशी ज्योती जगन्नाथ, शिराळा
९८) शेटे आदिनाथ, शिराळा
९९) गावडे ---, शिराळा
१००) मोमीन दिलावर रसुल, शिराळा
१०१) मिरजकर महेश अरुण, रिळे
१०२) जाधव बाजीराव आनंदा, चिंचोली
१०३) वाघ सुखदेव मारुती, इस्लामपूर
१०४) चरापळे शिवाजी बापू, शिराळा
१०५) राठोड विनोद देवचंद, शिराळा
१०६) काटे अनिल काशिनाथ, शिराळा
१०७) बनसोड राजेन्द्र बापू, शिराळा
१०८) गावडे काशीलिंग रघुनाथ, शिराळा
१०९) मिरजकर शरद ज्ञानदेव, शिराळा
११०) कुंभार अर्जुन लक्ष्मण, शिराळा
१११) पवल शामराव परशुराम, शिराळा
११२) यादव श्रीधर यशवंत, शिराळा
११३) हसबनीस दिनेश, शिराळा
११४) दुवुले ऊर्मिला, शिराळा
११५) नलावडे विजयराव, शिराळा
११६) कुंभार कल्पना शिवाजी, शिराळा
११७) आत्तार दस्तगीर गुलाब, शिराळा
११८) शेटे सचिन चंद्रकांत, शिराळा
११९) जाधव अजय भाऊसाहेब, शिराळा
१२०) पाटील अशोक सखाराम, शिराळा
१२१) महाजन सुमंत, शिराळा
१२२) पावल विष्णू नारायण, पालेवाडी
१२३) पाटील सर्जेराव जगन्नाथ, बिलाशी
१२४) शिंदे प्रभा रामचंद्र, मांगीले
१२५) पाटील एस. एन., कोकरूड
१२६) देशपांडे शरद मधुकर, पुणे
१२७) शालगांवकर जयप्रकाश, इचलकरंजी
१२८) ठाकुर अनिल वामन, मोघरपाडा
१२९) आचार्य चारुता रवीन्द्र, पुणे
१३०) माटे साधना, पुणे
१३१) पवार आदिनाथ हरिदास, पुणे
१३२) शेंडगे बाबासाहेब रावसाहेब, सांगवी
१३३) कुलकर्णी संजय, सोलापूर
१३४) कुलकर्णी विलास विठ्ठल, सोलापूर
१३५) गांधी राजेन्द्र मोतीचंद, सोलापूर
१३६) --- वैजिनाथ पांडुरंग, हर्जापूर
१३७) कवडे यशवंत गणेश, पुणे
१३८) पेंडसे सुजाता प्रमोद, कोल्हापूर
१३९) पचिंद्रे श्रीराम गणपत, कोल्हापूर
१४०) बापट माधव सदाशिव, सांगली
१४१) खेबुडकर अनिता अ., मिरज
१४२) टिळक अविनाश, सांगली
१४३) धुळुबुळु भिमराव, मिरज
१४४) बोरगावे धनदत्त, मिरज
१४५) दातार रोहिणी धनंजय, पुणे
१४६) जोशी गीतांजली, पिंपळे सौदागर
१४७) नलगे राजशेखर शरणप्पा, सोलापूर
१४८) मेहता अशोक शंकरलाल, सोलापूर
१४९) मैंदर्गीकर महेश बाबुराव, सोलापूर
१५०) कांबळे कमलाकर श्रीपाद, पुणे
१५१) माने रवीन्द्र सदाशिव, पुणे
१५२) आंबेकर श्रीकांत गणेश, पुणे
१५३) कुलकर्णी सुनील प्रभाकर, सांगली
१५४) नरवडे देविदास धोंडुजी,
१५५) सोनवणे सुनील लाला,
१५६) लाटकर विजय विठ्ठलराव,

## टिपण!

– अंजली कुलकर्णी

*(महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे आलेल्या काही ग्रंथांची संक्षिप्त-समीक्षेने, दखल घेतली आहे. निवडक टिपण!)*

### (१) मराठी कवितेचा सरवा

विदर्भात राहून, कविता व्यवहाराच्या कोणत्याही लिप्ताळ्यात न अडकता व्रतस्थपणे कवितेची साधना करणारे ज्येष्ठ कवी श्रीधर शनवारे यांचा 'सखा' हा नवीन कवितासंग्रह प्रकाशित झाला आहे. यापूर्वी त्यांचे 'आतून बंद बेट' 'उन्ह उतरणी', 'थांग-अथांग', 'तीन ओळींची कविता' असे कवितासंग्रह प्रकाशित झाले ओहत.

माणूस आणि निसर्ग, माणूस आणि इतर माणसे, माणूस आणि ईश्वर आणि माणूस आणि त्याचे अंतर्मन यातील नात्यांचा शोध घेण्याचा ध्यास लागलेली कविता हा श्रीधर शनवारे यांच्या कवितांचा गाभा आहे. हा कवी निसर्गात रमतो; परंतु निसर्गाकडे तो केवळ, निव्वळ निसर्ग म्हणून बघत नाही, तर त्यांचे निसर्गनिष्ठ मन भावानुभवाचा आधार घेत मंनुष्यापर्यंत, माणसांच्या वृत्ति-प्रवृत्तींचा शोध घेण्यापर्यंत आणि ईश्वराच्या जाणिवेपर्यंत पोहोचते. अत्यंत तरल भाषाशैलीमध्ये सामाजिक भानाचीही कविता लिहिणाऱ्या शनवारे यांनी सूक्ष्मातिसूक्ष्म अनुभव पकडले आहेत. या सर्व कवितांना एक आध्यात्मिक बैठक असल्याने या कविता एका वेगळ्या उंचीवर पोहोचतात.

श्रीधर शनवारे निसर्गानुभवामध्ये रमून जातात. निसर्गात सापडलेले अध्यात्म शोधण्याकडे त्यांचा कल आहे. सुरुवात तर मुखपृष्ठापासून आणि कवितासंग्रहाच्या नावापासूनच होते. प्रचंड बर्फवृष्टीमध्ये, सगळीकडे बर्फावाचून काहीच नाही अशा अवस्थेत पक्ष्यांसाठी माणसाने बनवलेल्या




एका घरट्याच्या आश्रयाला आलेली एक खार. या खारीचे छायाचित्र शनवारे यांनी आपल्या संग्रहाच्या मुखपृष्ठासाठी निवडले ही गोष्ट अत्यंत बोलकी आहे. त्या घरट्यात दयाळू माणसाने ठेवलेले चार दाणे हाच त्या खारीचा सखा, हाच तिचा एकमेव जीवनाधार.

श्रीधर शनवारे यांना त्यांच्या आयुष्याचे सारेच सारसर्वस्व निसर्गात सापडते. त्यांची कविता ही देखील सर्व ऋतूंना आपल्यात विरघळवून टाकणारा 'सातवा ऋतू'च आहे. 'कवितेचे ऋतूंशी निकटचे नाते असते' असे उद्‌गार त्यांच्या कवितेत येतात.

निसर्ग जाणिवेशी तादात्म्य पावण्याची ओढ या कवीला लागली आहे. त्याचप्रमाणे स्त्रीपुरुष नात्यातील गहिरेपण, उत्कटता अधोरेखित करणाऱ्या काही कविता या संग्रहात आहेत. उदा. 'भुट्टा' या कवितेत ते म्हणतात –

*'तू म्हणाली*
*तुम्ही अर्धा भुट्टा खा*
*उरलेला अर्धा*
*आपण दोघे मिळून खाऊ'*

असे असले तरीही भोवतीचे बदलत चाललेले दहशतीखालचे जग या जगदुनियेपासून दूर एकान्त गुहेत राहणाऱ्या कवीपर्यंतही पोहोचले आहे. या दहशतीमध्ये सारा भोवताल, सारा निसर्ग, सारी सृष्टी नष्ट होईल की काय या भीतीपोटी पुढील उद्‌गार उमटतात –

*'कासवी,*
*सांभाळ तुझा*

*झऱ्या काठचा खोपा*
*कधी भुई सुरुंग फुटेल*
*आणि तो उद्ध्वस्त होईल*
*सांगता येत नाही'*

कवितागत कहाणी हे देखील श्रीधर शनवारे यांच्या कवितेचे एक वैशिष्ट्य आहे. त्यांच्या अनेक कवितांमध्ये अशी एखादी काव्यात्म कथा भेटते. उदा. चेकॉव्ह, माणसे आणि फुले ही अफलातून कविता.

*"त्याला फुले फार असायची प्रिय*
*त्याला आवडायची माणसे*
*क्वचित नावडायचीही"*

अशा अल्पाक्षरांतून आशयसमृद्ध, तरल, उत्कट आणि मनाच्या आतल्या दिशेकडे वळवणारी, लिप्ताळ्याकडे एका योग्याच्या अलिप्त दृष्टीने बघणारी 'सखा' मधली कविता वाचकाला एक अपूर्व समाधान देते.

### (२) वर्तमान वास्तवाच्या उत्कट नोंदी

'माझ्या वर्तमानाची नोंद' हा कवी पी. विठ्ठल यांचा कवितासंग्रह 'गोदा प्रकाशना'ने प्रकाशित केला आहे.

'माझ्या वर्तमानाची नोंद' ही समकालीन वास्तवाची संबंध असणारी कविता आहे. ही बाब कवितासंग्रहाच्या शीर्षकापासूनच अधोरेखित होते.

प्रत्येक काळामध्ये कवी आपल्या कवितेची सामग्री आपल्या वर्तमानातून गोळा करताना दिसतात. त्या-त्या काळातल्या सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, आर्थिक घडामोडींचे, पर्यावरणाचे पडसाद प्रथम कविता या वाङ्मप्रकारात उमटतात. प्रचलित, प्रस्थापित व्यवस्थेविषयीची एक अस्वस्थता, असमाधान, चीड, संताप, हतबलता ही या निर्मितीपाठीमागे असते. साठोत्तरी काळातल्या दलित, ग्रामीण, आदिवासी, नंतरच्या काळातल्या स्त्रीवादी कवितांचे प्रवाह याचीच साक्ष देतात. १९९० नंतर उदारीकरणाच्या, जागतिकीकरणाच्या सुरू झालेल्या प्रक्रियेमुळे प्रचंड स्वरूपात ढवळून निघालेल्या आणि संभ्रमात सापडलेल्या मनुष्यजीवनाचे आकलन करून घेण्याचा प्रयत्न ९० नंतरच्या कवींमध्ये दिसतो.



१९९० नंतर वेगाने बदलत गेलेला भोवताल, वैश्विक खेडे, उदयाला आलेली 'मॉल' संस्कृती, वस्तू आणि माणूस यांच्यातला-यांच्यात मिटत चाललेला दृष्टिकोनात्मक फरक, नातेसंबंधांमध्ये निर्माण झालेली विसविशीत जाणीव, माध्यमांनी ताब्यात घेतलेली मानसिकता, ढासळत चाललेले पर्यावरण, लोप पावत चाललेली मूल्यव्यवस्था, आणि त्याचवेळी घट्ट होत चाललेला जातिधर्माचा, अंधश्रद्धेचा, भ्रूणहत्येचा विळखा या सगळ्या विपरीत, परस्परविरोधी आणि मानवताहीन वास्तवाने सैरभैर होणारे संवेदनाशील कवीमन इथे प्रकर्षाने सहकंप पावताना दिसते.

तसे पाहिले तर जागतिकीकरणाच्या आगमनानंतरच्या जगाचे आंकलन हे विविध पद्धतीने करून घेता येते. प्रभाकर बागले यांनी प्रस्तावनेत त्याला 'अनेकमुखी रावण' म्हटले आहे. प्रभाकर बागले यांनी प्रस्तावनेत आजच्या समकालीन वास्तवाचा आणि त्याकडे बघण्याच्या दृष्टिकोनाचा एक सुंदर पट मांडला आहे. प्रत्येकजण आपल्याला दिसलेले, जाणवलेले असे वास्तवाचे दर्शन कवितेत घडवत असते. पी. विठ्ठल यांनीही ते मांडले आहे आणि स्वच्छपणे मांडले आहे.

कवितासंग्रहाच्या नावातच म्हटल्याप्रमाणे कवीने 'आपल्या' वर्तमानाची नोंद इथे केली आहे. साठोत्तरी काळापासून हेच वैशिष्ट्य राहिले आहे की, इथे भोवतालात घडणारी घटिते आपल्या जगण्यापर्यंत



अनुक्रमणिका

येऊन पोहोचतात. ९० नंतरच्या काळात तर हे वास्तव वेगाने आणि भीषण चेहरा घेऊन आपल्या दारापर्यंत येऊन धडकले आहे आणि रोजच त्या वास्तवाला माणसांना सामोरे जावे लागत आहे. म्हणूनच 'मी' 'आपण' या वास्तवात इतके गुंतलो आहोत की, त्याचा भागच बनून गेलो आहोत. आधी जाणीव कवीला होते; म्हणूनच तो या वर्तमानाच्या नोंदी ठेवण्यास उद्युक्त झालेला दिसतो.

या नोंदींमध्ये मग 'पुजाऱ्याच्या भीतीने थरथरणारे देव' आहेत, 'राशी'भोवती घुटमळणारे क्षण आहेत, महानगरातले 'मल्टिप्लेक्स' जगण्याचे दिवस आहेत आणि टीव्हीभोवती केंद्रित झालेली मनं आहेत, संस्कृतीचे नागवेपण आहे, 'यूज अॅन्ड थ्रो'चे प्रचलित झालेले सूत्र आहे. तथाकथित महासत्तेकडे वाटचाल करताना विकासाच्या नावाखाली ओरबाडलेले पर्यावरणही आहे. या साऱ्याचे भेदक चित्रण करताना कवी म्हणतो –

*''मग त्यांनी जेसीबीचा फाळ रुतवून*
*हिरव्यागार शेतीची आतडी ओरबाडून काढली*
*– मी बोललो नाही''*

ही अगतिकतेची आणि संतापाची जाणीव एखाद्या सुरीच्या धारदार पात्याप्रमाणे कवितेत उमटली आहे.

पी. विठ्ठल यांची शैली अनुभवाला थेट भिडणारी आहे. आंतरिक लय असलेल्या मुक्तछंदाची ते प्रभावीपणे हाताळणी करतात, रोजच्या जगण्यातल्या चाकोरी टाईप गोष्टींमधून निरर्थकता सूचित करतात. महानगरी जीवनातल्या वर्तमान नोंदींचा हा पट सुव्यवस्थितपणे मांडला गेला आहे, हे निश्चित.

### (३) संपादकीय कौशल्याचा वस्तुपाठ

मुकुंद टाकसाळे यांनी संपादित केलेले 'जयवंत दळवींचा विनोदनामा' हे पुस्तक मॅजेस्टिक प्रकाशनाने प्रकाशित केले आहे.

जयवंत दळवी हे मराठी विनोदी वाङ्मयामधले महत्त्वाचे नाव. त्यांच्या विनोदाची जातकुळी वेगळीच होती. एखाद्या व्रात्य, खोडकर मुलाने जाता जाता इतरांच्या टोप्या उडवाव्या त्याप्रमाणे जयवंत दळवी यांचे लेखन खुमासदार होते. त्यांच्या विनोदाची स्वत:ची अशी वेगळी शैली होती. जवळजवळ तीनचार दशकं जयवंत दळवी यांनी कथा, कादंबऱ्या, 'ठणठणपाळ' आणि 'अलाणे फलाणे' सारखी सदरे, प्रवासवर्णन यातून विनोदी वाङ्मयाची निर्मिती केली त्यातही 'ठणठणपाळ' आणि 'अलाणे फलाणे' ही सदरे साहित्यिक क्षेत्रातील व्यक्ती, घटना, प्रसंग यांना मध्यवर्ती स्थानी ठेवून लिहिलेली असल्याने आणि त्यातून अनेक साहित्यिकांच्या टोप्या उडवल्या असल्याने ती विशेष गाजली.




जयवंत दळवी यांनी सातत्याने विनोदी लेखन केले; परंतु टाकसाळे यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे पु. ल. देशपांडे किंवा आचार्य अत्र्यांप्रमाणे जयवंत दळवी यांच्या नावाचे 'ग्लॅमर' निर्माण झाले नाही; किंवा या दोघांएवढी लोकप्रियताही त्यांना लाभली नाही. टाकसाळे यांनी त्याची कारणे शोधण्याचा प्रयत्न प्रस्तावनेत केला आहे, आणि जयवंत दळवी यांचे मराठी विनोदी साहित्यनिर्मितीचे महत्त्व अधोरेखित करण्याच्या हेतूने त्यांच्या कथांचे संपादन केले आहे.

टाकसाळे यांनी या पुस्तकात हेतूपूर्वक 'ठणठणपाळ'मधील लेखनाचा अधिक समावेश टाळला असल्याचा उल्लेख त्यांनी केला आहे. त्यांनी दळवी यांच्या विविध पुस्तकांतील एक वा दोन कथांचा/प्रकरणांचा समावेश करून दळवींच्या लिखाणातील त्यांच्या आशय व शैलीतील वैविध्य आणि विनोदाचे स्वरूप लक्षात येईल अशा तऱ्हेने त्यांची मांडणी

केली आहे. प्रत्येक भागाच्या सुरुवातीला संबंधित पुस्तकाच्या मुखपृष्ठाची छोटी प्रतिमा टाकल्यामुळे वसंत सरवटे यांनी काढलेल्या मुखपृष्ठांची खुमारी वाचकांना काही अंशी तरी अनुभवता आली आहे.

दळवींच्या 'फजीतवाडा' या पुस्तकातील 'म्हातारी मेल्याचे दु:ख' 'सरमिसळ' मधील 'एका सहलीची गोष्ट', 'सारे प्रवासी घडीचे' या कादंबरीचे एक प्रकरण, 'परममित्र' या पुस्तकातील 'जी.ए.' 'भाऊसाहेब आणि भाऊराव' अशी व्यक्तिचित्रणे', 'आत्मचरित्राऐवजी' या पुस्तकातील 'मी नाटककार कसा झालो' हे आत्मकथन, 'निवडक ठणठणपाळ' मधील 'दिवाळी विशेषांकाचे ढीग', 'अलाणेफलाणे' मधील 'कांदेवाडीचा कार्ल मार्क्स', ह्या लेखनाचा समावेश, या पुस्तकात आहे. या निमित्ताने जयवंत दळवी यांनी विनोदी लेखन करताना किती विविध वाङ्मयप्रकार यशस्वीपणे हाताळले; आणि कथा, कादंबरी, आत्मकथन, प्रवासवर्णन, साहित्यिक टिप्पणी या अनेक वाङ्मय प्रकारांवर त्यांचे कसे प्रभुत्व होते; या बाबींकडे लक्ष वेधण्याचे काम टाकसाळे यांनी केले आहे. त्यांच्या संपादनातील अभ्यासपूर्णता आणि साक्षेपी दृष्टी यांचा प्रत्यय यातील साहित्याच्या निवडीमधून निश्चितपणे जाणवतो. प्रत्येक भागाच्या प्रारंभी पुस्तकाचे नाव, पहिल्या आवृत्तीचे प्रकाशन वर्ष व चित्रकार वसंत सरवटे यांचे नाव टाकल्यामुळे या संपादनाला संदर्भमूल्य लाभले आहे.

मुकुंद टाकसाळे यांनी प्रस्तावनेत जयवंत दळवी यांच्या विनोदाच्या प्रतीची आणि जातकुळीची चिकित्सा केली आहे. मराठी विनोदी साहित्यातील दोन मुख्य प्रवाहातील भेद स्पष्ट करताना समाजातील अनिष्ट रूढी, चालीरीतींवर विनोदी अंगाने भाष्य करणारा श्रीपाद कृष्ण, राम गणेश गडकरी, आचार्य अत्रे, पु. ल. देशपांडे यांच्या लेखनाचा एक प्रवाह; आणि दुसरा निखळ आणि निर्मळ विनोद असणारा चिं. वि. जोशी यांच्या लेखनाचा प्रवाह अशा दोन प्रवाहांपैकी चिं. वि. जोशी यांची परंपरा ही अधिक 'साहित्यिक' असल्याचे त्यांनी म्हटले आहे. या परंपरेला कालखंड, प्रसंग, व्यक्तिसंदर्भ यांच्या सापेक्षतेचा अडसर नाही. टाकसाळे यांनी जयवंत दळवी हे एकाच वेळी दोन्ही 'स्कूल'चे होते असे मत या प्रस्तावनेत मांडले आहे.

स्वत: सिद्धहस्त विनोदी परंपरेचे लेखक असल्याने टाकसाळे यांच्या संपादनाला, त्यांच्यातल्या अनुभवी लेखकाची चांगली जोड मिळाल्याने हे पुस्तक विनोदी साहित्याच्या संपादन समीक्षेतील एक महत्त्वाचे पुस्तक ठरावे.

### (४) आजच्या काळाची खुमासदार कथा

मुकुंद टाकसाळे यांचा नवा कथासंग्रह 'राधेने ओढला पाय' नुकताच प्रकाशित झाला आहे. गेली अनेक वर्षे मुकुंद टाकसाळे यांनी मराठीतील चांगल्या विनोदी लेखनाचे पाईकपण सांभाळले आहे. गंभीर लेखनापेक्षा विनोदी लिहिणे ही एक अत्यंत अवघड गोष्ट आहे. मुख्य म्हणजे त्यासाठी भोवतालातील वैचित्र्य, विसंगती आणि मर्म, त्रुटी टिपण्याची एक वृत्ती असावी लागते. कृत्रिमपणे विनोदाची निर्मिती करता येत नाही. ती ऊर्मीसारखी आतून यावी लागते. त्यासाठी स्वत:मध्ये सातत्याने एक टवटवीत, सजग आणि खेळकर वृत्ती जोपासावी लागते. मुकुंद टाकसाळे यांनी तशी वृत्ती निश्चितपणाने जोपासली आहे.

'राधेने ओढला पाय' मधल्या कथा या आजच्या काळाच्या कथा आहेत. आजचे नागरी समकालीन वास्तव हे या कथांचे आशयकेंद्र आहे. विशेषत: गेल्या वीस एक वर्षांत जागतिकीकरणाच्या प्रभावामुळे माणसांच्या जीवनावर जो विविध स्वरूपी परिणाम झाला आहे, जो एक निर्बुद्ध चंगळवाद फोफावला आहे,



संगणकीकरण, बाजारीकरण, यांत्रिकीकरणाने माणसांची जीवने ताब्यात घेऊन, त्यांची विवेकबुद्धी नष्ट करून त्यांच्यात एक अविचारी मूर्खपणानं कुठल्यातरी गोष्टीमागे धावण्याची वेडी ईर्ष्या ('क्रेझ') निर्माण केली आहे; या सगळ्या वास्तवाकडे एका नर्मविनोदी पद्धतीने पाहात टाकसाळे यांनी हे वास्तव मांडले आहे.

या पुस्तकात इले-माध्यमांचा माणसाच्या जीवनावरचा पगडा आणि भौतिकतेने (व्हर्च्युअल रिॲलिटी)ने माणसांची ताब्यात घेतलेली मने यावर सुंदर प्रकाश टाकणाऱ्या 'ऑरकुटा मुलगा आणि त्याचा बाप' आणि 'राधे ने ओढला पाय' सारख्या कथा आहेत. 'मोले घातले' सारख्या कथेत माणसांच्या जीवनातला, नात्यांतला अस्सलपणा लोप पावून माणसे कृत्रिम, दिखाऊ आणि भपकेबाज जगणे जगण्याच्या पाठीमागे लागलीत; यावर खुसखुशीत शैलीत नेमके बोट ठेवले आहे. लग्नकार्यात सर्व विधींच्याबरोबर आत्या, मामा, काका अशी जवळची माणसे भाड्याने पुरवण्याचेही 'एकगठ्ठा व्यवहार' – ('पॅकेजडील') बाजारामध्ये उपलब्ध आहे, असे आजच्या परिस्थितीवरचे एक खुमासदार भाष्य त्यांनी केले आहे. संस्कृती म्हणजे खरे काय, हे नीटपणे जाणून न घेताच वरपांगी गोष्टींमधून संस्कृती जपण्याची वेडी ईर्ष्या ('क्रेझ') असलेल्या माणसांचा इथे खरपूस समाचार घेतला आहे. तर 'बहिणाबाईंचा नातू' या कथेत साहित्यक्षेत्रात (विशेषत: कवितेच्या क्षेत्रात) बोकाळलेल्या बाजारबुणगेपणावर त्यांनी आपले विनोदी टीकास्त्र सोडले आहे.

या सगळ्या कथा शहरी मध्यमवर्गीय माणसांच्या कथा आहेत. जागतिकीकरणाच्या काळात मध्यमवर्गाची व्याप्ती वाढली. संगणकयुगात देशपरदेशात निर्माण झालेल्या प्रचंड रोजगारामुळे मध्यमवर्गीयांच्या पोरांना आणि त्यामुळे त्यांच्या आईबापांनाही परदेशवाऱ्या घडू लागल्या, हातात पैसा खुळखुळू लागला. या अचानक वाढलेल्या पैशामुळे आजवर दात कोरून पोट भरणारा मध्यमवर्गीय माणूस चैनीकडे, चंगळवादाकडे झुकला. अचानक गवसलेल्या या सुबत्तेमुळे एक प्रकारच्या उन्मादी अवस्थेत तो जगू लागला. पूर्वी न मिळालेल्या आयुष्यातली मजा लुटू लागला. मात्र हे करताना त्याच्यातील विवेकाची, मूल्ययुक्त जगण्याची साथ कशी सुटली आणि नव्या, काहीशा भ्रष्ट आयुष्याच्या भोवऱ्यात तो कसा सापडला, हे त्याचे त्यालाही कळले नाही. जुन्या संस्कृतीची नाळ त्याला अधूनमधून मागे खेचते, आणि पापक्षालन केल्यासारखा तो अत्याधुनिक जीवनशैलीत जुनी संस्कृती जपण्याचा अट्टहास करतो आहे. ही सगळी आजची परिस्थितीच टाकसाळे यांनी अत्यंत खुसखुशीत पद्धतीने, कधी अतिशयोक्तीचा आधार घेत, तर कधी निव्वळ वास्तव हेच पुरेसे विनोदी आहे, असे जाणून ते समोर ठेवून मांडले आहे. एक प्रकारे बदलत चाललेल्या भोवतालाचा, मानसिकतेचा हा वेगळ्या पद्धतीने घेतलेला शोधच आहे. माणसांच्या वर्तनातील विक्षिप्तपणा, वरपांगीपणा आणि विसंगती विनोदाच्या अंगाने दाखवणाऱ्या या कथा आजच्या भोवतालाचा आरसाच आहेत.

मात्र, हा विनोद डंख मारणारा नाही. माणसांमधील वर्तनविचित्रे रेखाटतानाही ते माणसांना धुत्कारत नाहीत वा उपहासाने क्षुद्र लेखत नाहीत. या गोंधळलेल्या माणसांविषयी त्यांच्या मनात प्रेम आहे, आपुलकी आहे, ही आपलीच माणसे आहेत; ही भावना आहे. त्यामुळे हा विनोद बोचरा न होता आनंददायी होतो.

### (५) 'तडका' स्फुटलेखन!

'चकमकी – अवतीभवतीच्या' हे स्फुटलेखनपर पुस्तक प्रसिद्ध लेखक कै. ना. धों. ताम्हनकर आणि प्रा. गो. वि. कुलकर्णी यांच्या 'तडका'वजा लेखनाने चविष्ट झाले आहे. या पुस्तकात या लेखकद्वयींनी चितारलेल्या, रोजच्या जीवनातल्या विविध माणसांमधल्या चकमकी आहेत. 'जीवन ही एक

रंगभूमी आहे' असे शेक्सपीअरने म्हटले होते ते थोड्या निराळ्या अर्थाने. जीवनाच्या रंगभूमीवरती आपापली भूमिका साकारणारी आपण माणसे म्हणजे केवळ त्या महानाट्यातली पात्रे किंवा कळसुत्री बाहुल्या आहोत, असे शेक्सपीअरने म्हटले आहे. 'चकमकी'मध्ये शेक्सपीअरच्या पुढच्या अर्ध्या वाक्याचा संबंध नाही; परंतु जीवनात नाट्य पुरेपूर भरलेले आहे, या अर्थाने पहिले अर्धे वाक्य, स्वीकारण्यास प्रत्यवाय नाही. हेच शिगोशीग, ठायीठायी भरलेले 'संसार नाट्य' या लेखकद्वयींच्या आपापल्या चकमकींमधून प्रत्ययाला येते.

माणसे तशीही संघर्षशील असतातच. कुठल्याही नात्याने दोन माणसे समोरासमोर आली, तर त्यांच्यामध्ये एक छुपी बायको, मित्र-मित्र, सासू-सुना, बॉस-नोकर, शेजारी-शेजारी किंवा अगदी बसच्या छोट्या प्रवासात भेटलेली चालक-वाहक आणि प्रवासी अशी असोत. दोन माणसांचे काही ना काही खटके, काही ना काही कारणाने, कित्येकवेळा कारणाशिवायही उडत असतात. असे खटके लांबून बघणाऱ्या तिसऱ्या माणसाला त्यातले नाट्य, त्यातली फोलपणाची गंमत, त्यांचे विनोदी स्वभाव, हजरजबाबीपणा, 'अरे-ला-कारे' म्हणण्याची भांडखोर वृत्ती आणि तरीही त्या दोन व्यक्तींमधला अदृश्य स्नेहबंध जगवल्याशिवाय राहात नाही. मनुष्यस्वभावाच्या विविधपरी पाहून त्याचे भरपूर मनोरंजन होते.

'चकमकी अवतीभोवतीच्या' या पुस्तकात या दोन्ही लेखकांनी लिहिलेल्या अशाच विविध माणसांमधल्या चकमकींचे दर्शन घडवले आहे. ज्येष्ठ लेखक ना. धों. ताम्हनकर यांच्या लेखक व त्याची बायको यांच्यातील चकमकीत बायकोला नवऱ्याच्या लिखाणाचा, . त्याने लिहून ठेवलेल्या भारंभार कागदांचा, टाचणंटिपण्यांचा त्रास होतो आहे. तिला लेखकाच्या लेखकपणाचे कौतुक तर लांबच पण घरातली ही अडगळ म्हणजे केवळ उंदरांसाठी मेजवानी अशी तिची भावना आहे. ते सगळे कागद बंबात घालणार अशी घोषणा ती करते. या पुस्तकातील सगळ्यात हृद्य चकमक आहे ती 'चकमक – कट्टी गट्टीची' अर्थात सासूसुनांची. सासूसुनांचे भांडण हा शतकानुशतके चालावा इतका सनातन विषय आहे. परंतु सुनेची उणीदुणी काढणारी सासू, नातवाच्या मुंजीत सुनेला पांढरे जरीचे पातळ घेतलेच पाहिजे, असा हट्ट मुलाकडे धरून बसते, तर सूनही तितक्याच अटीतटीने सासूसाठी साडी आणि शाल घेतली पाहिजे असा आग्रह धरते. चकमकी सुरू असतात पण सहवासाने परस्परांमध्ये जे प्रेम, जिव्हाळा निर्माण होतो त्याचेही 'चकमक' हे एक अत्यंत हृदयस्पर्शी उदाहरण आहे. प्रा. गो. वि. कुलकर्णी यांच्या 'चकमक ऑफिस बॉयची', 'चिरंजीवांची' आणि 'हॉटेल मालक आणि गिऱ्हाईक' या त्यातल्या बोचरेपणाने चटकदार झाल्या आहेत. म्हणूनच या चकमकी माणसांच्या जीवनात तोंडीलावण्यासारख्या किंवा पदार्थाला दिलेल्या खमंग तडक्यासारख्या माणसांचे जीवन रंगतदार करतात. या चकमकींच्या आड अदृश्यपणे पण घट्टपणे बांधला गेलेला प्रेमाचा धागा असतो.

प्रा. गो. वि. कुलकर्णी आणि ना. धों. ताम्हनकर या लेखकद्वयींच्या वेगवेगळ्या दृष्टिकोनाचे आणि विनोद वैशिष्ट्यांचे दर्शनही या पुस्तकात होते. सामान्य माणसांच्या अभावग्रस्त जीवनात आनंदाची कारंजी फुलवणाऱ्या या चकमकी नक्कीच मनाचा वेध घेतात.

◇◇◇

**अंजली कुलकर्णी**
३, विघ्नहर, जयवर्धमान सोसा., बिबवेवाडी रस्ता,
पुणे ४११०३७. मो. नं. ९९२२०७२१५८



अनुक्रमणिका

## निवडक नवे

– उद्धव कानडे

*महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर*

### (१) या सुंदर... पाऊलवाटा

मु.पो. पिसर्वे ता. पुरंदर, जि. पुणे या छोट्या खेडेगावात एका शेतकरी कुटुंबात विजय विनायक कोलते यांचा जन्म झाला. शालेय शिक्षण सासवड आणि पुण्यात झाले. वकिलीची पदवी प्राप्त केल्यावर शहरात आयुष्याला सुरुवात करूनही त्यांचे संस्कारक्षम मन शहरातल्या देखण्या वाटांवर रमले नाही. काळ्याभोर मातीवरल्या हिरव्यागार सुंदर वाटा आणि मनातल्या निरामय प्रेमाचा निरागस झरा त्यांच्या मनाला पुन:पुन्हा माणुसकीच्या आणि गावच्या मातीच्या वाटेनेच घेऊन गेला. गावच्या मातीवर, गावच्या माणसांवर, संस्कार देणाऱ्या नात्यांवर प्रेम करणारा लेखकाचा संवेदनशील प्रवास म्हणजे विजय कोलते यांच्या अनुभवांचा एक सुंदर फुलांचा हळवा गुच्छ म्हणजेच त्यांचा 'या सुंदर.... पाऊलवाटा' हा ग्रंथ होय.

कविवर्य ना. धों. महानोर यांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना हीच एक सुंदर पाऊलवाट आहे.

खेड्यातला माणूस शिक्षणानं, ज्ञानानं सुसंस्कृत बनला. खेड्यावर लक्ष केंद्रित करून मनोभावे खेड्यांचा विकास करावा. महात्मा गांधी यांच्या स्वप्नातलं खेडं पाहायला मिळावं. यशवंतराव चव्हाणसाहेब आणि शरदराव पवारसाहेब यांच्या स्वप्नातला समृद्ध शेतकरी पाहायला मिळावा; यासाठी विजयराव कोलते यांनी ग्रामीण भागात उभं केलेलं मोठं कामही वाचकांच्या समोर उभं राहातं. पुणे जिल्हा परिषदेचे अध्यक्षपद आणि महाराष्ट्र कृषी परिषदेचे उपाध्यक्षपद या माध्यमातून शेतकऱ्यांसाठी आणि ग्रामीण भागातील जनतेसाठी त्यांनी केलेलं भरीव कार्य. आचार्य अत्रे यांच्या गावी, म्हणजे सासवड येथे, आचार्य अत्रे साहित्य संमेलन भरवून त्या भागातल्या वाचकांना, रसिकांना साहित्यविचारांची श्रीमंती प्राप्त करून देण्यात विजयराव कोलते यशस्वी झालेले आहेत. जीवनाच्या ह्या पाऊलवाटा लक्षणीय आहेत.




*(लेखक : विजय कोलते - प्रकाशक - उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पाने १२८, मूल्य १५० रुपये).*

### (२) नाटककार शिरवाडकर

तात्यासाहेब तथा वि. वा. शिरवाडकर यांचे २०११-२०१२ हे जन्मशताब्दी वर्ष म्हणून महाराष्ट्रभर विविध उपक्रमातून साजरे झाले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी लिहिलेल्या 'नाटककार शिरवाडकर' या अभ्यासपूर्ण ग्रंथामुळे वि. वा. शिरवाडकरांच्या जन्मशताब्दी वर्षात लेखकाने वाचकांना सादर केलेली ही आगळी-वेगळी सुंदर भेट आहे. ह्या ग्रंथात शिरवाडकरांच्या समग्र नाट्यकृतींची अभ्यासपूर्ण मांडणी करण्यात आलेली आहे. वि. वा. शिरवाडकरांनी एकूण १८ नाटके लिहिली. प्रारंभीचे 'दूरचे दिवे' ते अखेरचे 'कैकेयी' या नाटकापर्यंतचा नाट्यलेखन प्रवास उलगडून दाखवताना लेखकाने घेतलेली मेहनत पानापानावर जाणवत राहाते. केवळ नाटकांच्या संहितेवर भाष्य न करता, रंगभूमी माध्यमातून टाकलेला प्रकाश वाचकांच्या आणि अभ्यासकांच्या दृष्टीनेही



महत्त्वाचा ठरलेला आहे. कारण नाटकाची संहिता आणि नाटकाचा प्रयोग असा समग्र नाट्यकृतींचा एकत्रित विचार मांडणारे हे पुस्तक आहे.

*(लेखक : डॉ. वि. भा. देशपांडे, प्रकाशक - नवीन उद्योग, पुणे. पाने-१८४ मूल्य - २०० रु.).*

**(३) जगातील ।। सर्वोत्तम राजा ।। छत्रपती शिवाजी**

काशिनाथ मढवी यांच्या अथवा परिश्रमातून, अभ्यासातून, विवेकी संभ्रमातून साकारलेला 'जगातील सर्वोत्तम राजा छत्रपती शिवाजी' हा ग्रंथ संस्कृती प्रकाशनाच्या सौ. सुनिताराजे पवार यांनी तेवढ्याच मेहनतीने अतिशय सुबक आणि देखण्या रूपात वाचकांच्यासमोर ठेवला आहे. या ग्रंथाची रचना चार भागांत केलेली आहे. यातला तिसरा भाग तर अतिशय महत्त्वाचा आहे. यात जगातल्या सर्वोत्तम राजाची गुणवैशिष्ट्ये दिलेली आहेत. त्यात राजांचा आहार, संयमीपणा, आत्मविश्वास, मुत्सदीपणा, शुद्धशील, प्रतिभा, स्वाभिमान, प्रेमळपणा, उदारपणा, अस्मिता, बहुभाषिकत्व, उत्तम संघटक, सर्वधर्मसमभाव, मुलुखगिरी, सैन्यातील शिस्त, पर्यावरणाचे जतन, सतर्कता, मानसशास्त्रतज्ज्ञ, स्थापत्यतज्ज्ञ, रयतेची कणव, वैज्ञानिक दृष्टिकोन, नाविकदलाचा जनक गनिमी कावा, नि:संशयपणा अशा शंभर गुणांचा अभ्यासपूर्ण आस्वादक लेखाजोखा वाचकांच्यासमोर ठेवला आहे.

इतिहासकारांनी मांडलेल्या शिवचरित्राचा बारकाईने अभ्यास करून शिवरायांचे एक मनोहारी रूप अतिशय समर्थपणे समाजासमोर ठेवण्यात लेखक कमालीचे यशस्वी झाले आहेत. शिवचरित्राचे निरनिराळे पैलू मांडताना लेखकाने ठेवलेला समतोल विचार या ग्रंथाचा खरा अलंकार आहे.




*(लेखक : काशिनाथ मढवी, प्रकाशक - संस्कृती प्रकाशन, पुणे, पृष्ठे - ४८०, मूल्य - ५०० रु.).*

**(४) होरपळ**

श्री. ल. सि. जाधव यांचे हे आत्मकथन आहे. त्यांचे बालपण सोलापूरच्या मातंग वस्तीत गेले. संघर्ष, उपेक्षा आणि अवहेलनेचे जगणे वाट्याला आले, तरी मनात कसला आकस नाही. कुशाग्र बुद्धिमत्ता आणि कठोर परिश्रमाच्या जोरावर उच्च शिक्षण घेऊन ते भारतीय स्टेट बँकेत वरिष्ठ अधिकारी पदापर्यंत पोहोचले. त्यांच्या या आत्मकथनाला समृद्ध सामाजिक जाणिवा आणि वास्तव वेदनांचा प्रामाणिक हुंकार यामुळे या आत्मकथनाला उच्च वाङ्मयीन दर्जा प्राप्त झालेला आहे. महात्मा जोतिबा फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, विठ्ठल रामजी शिंदे, शाहू महाराज आणि अण्णाभाऊ साठे यांच्या समता, मानवता, स्वातंत्र्य आणि बंधुता या श्रेष्ठ मूल्यांचं अधिष्ठान हीच त्यांची प्रेरणास्थाने आहेत. त्यामुळेच आत्मकथनातला प्रत्येक शब्द वाचकांशी प्रभावीपणे संवाद करतो. मातंग समाजाची दु:खं, वेदना, वास्तव आणि उपेक्षा समाजापुढे ठेवताना लेखकाच्या संयमी विचारधारेला आणि प्रचंड संवेदशीलतेला वाचन, चिंतन, आत्मशोधाची प्राप्त झालेली तेजस्विता पानापानांवर अनुभवायला मिळते.




*(लेखक : ल. सि. जाधव, प्रकाशक - सुविद्या प्रकाशन, सोलापूर, पाने - २५५, मूल्य - २३०).*

**(५) आत्मजाणिवेची कविता**

कविवर्य सुधांशु यांच्या 'औदुंबर' गावच्या पवित्र मातीचा सुगंध ज्यांच्या कवितेला लाभला ते कवी प्रा. तुकाराम पाटील यांच्या लेखणीतून साकारलेला हा ७ वा कवितासंग्रह निर्मोही या प्रकाशकानं मराठी



रसिकांसमोर आणला आहे. ग्रामीणजीवन आणि ग्रामीण माणसाचं जितं-जागतं जगणं मांडताना त्यांची कविता अनुभव आणि वास्तव यांपासून दूर जात नाही. मातीशी इमान राखून जगलो तरच जगणे सुंदर होईल हा कवीचा विश्वास नव्या तरुणाईला मातीचा महिमा हळुवारपणे सांगून जातो. हा कवी निसर्गात रमणारा जसा आहे, तसा प्रेमाच्या नाजूक तारा छेडणाराही आहे. मानवी जीवनाचे आणि जगण्याचे विविध पैलू या कवितासंग्रहात अनुभवता येतात. *(कवी : प्रा. तुकाराम पाटील, प्रकाशक - निर्मोही प्रकाशन, पिंपरी, पाने - १०६, मूल्य १२५ रु.).*

**(६) मनतरंग**

'मनतरंग' हा विनायक म्हेत्रे यांचा पहिलाच कवितासंग्रह नुकताच प्रकाशित झाला. कविवर्य दत्ता हलसगीकर यांची अभ्यासपूर्ण आस्वादक प्रस्तावना या संग्रहाला लाभली. कवीने जीवनात जे भोगले, जे पचवले आणि हृदयात भरून ठेवले तेच कवितेच्या अंत:करणात ताकदीने ओतले. जो भोगतो, जो खूप सोसतो; तोच काळजाला भिडणारं लेखन करू शकतो. कवी याच वाटेवरून आपल्या शब्दांना आशयसंपन्न बनवतो. 'मनतरंग' मधली एकूण कविता अशी चिंतनाच्या मुशीतून उगवलेली आहे; म्हणूनच ही कविता उपमा, प्रतिमा, प्रतीकं, अलंकार आणि वृत्तांच्या चाकोरीत अडकत नाही. अतिशय सोपी शब्दकळा आणि हृदयातली वेदना हाच म्हेत्रे यांच्या कवितेचा मोठा अलंकार आहे.



*(कवी - विनायक म्हेत्रे, प्रकाशक - अनुबंध प्रकाशन, पुणे. पाने - ९६ मूल्य - ९० रुपये).*

**(७) श्री महाबळेश्वर**

महाबळेश्वर निसर्गरम्य, शुद्ध हवामान आणि पर्यटकांना आवडणारे थंड हवेचे ठिकाण म्हणून सर्वांना ज्ञात आहे. महाबळेश्वर गावाची, तिथल्या निसर्गाची, भूभागाची आणि पूर्वीच्या लोकजीवनाची माहिती देणारा एक ग्रंथ खूप वर्षापूर्वी दत्तात्रेय कमलाकर दीक्षित यांनी लिहून ठेवला आहे. या ग्रंथाची मूळ प्रत ज्येष्ठ कादंबरीकार ह. ना. आपटे यांनी स्वत: तपासून दिली होती. अतिशय उपयुक्त माहिती या ग्रंथात वाचायला मिळते. हा ग्रंथ पर्यटकांच्या दृष्टीनेही महत्त्वाचा होता. या ग्रंथाची जुनी आवृत्ती संपल्यामुळे हे पुस्तक वाचकांना उपलब्ध होत नव्हते. ही बाब ध्यानात घेऊन दीक्षित कुटुंबीयांनी या ग्रंथाची नवीन आवृत्ती नुकतीच प्रकाशित केली आहे. महाबळेश्वरच्या संपूर्ण परिसराची अभ्यासपूर्ण माहिती लेखकाने या पुस्तकात मांडलेली आहे. या पुस्तकाचे वेगळेपण लेखकाच्या त्या काळातल्या भाषाशैलीमुळे मनात भरते. ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि भौगोलिक माहितीमुळे हा ग्रंथ वाचनीय झालेला आहे.




*(लेखक : दत्तात्रेय कमलाकर दीक्षित, पाने - २०६, प्रकाशक - दीक्षित कुटुंबीय महाबळेश्वर, मूल्य - ऐच्छिक).*

◇◇◇

**उद्धव कानडे**
६८६/२अ+२ब, ब्लॉक नं. १५,
ज्ञानगंगा, गृहरचना संस्था मर्या. बिबवेवाडी,
पुणे - ४११०३७, मो. ९८९०६५२७२३.

## मराठी कवितेतील 'घर'— सं. शीला निपुणगे

– टी एन् परदेशी

'घर' ही संकल्पना विश्वव्यापी आहे. खोपटापासून ते महालापर्यंत त्याचे दृश्यरूप कोणतेही असो, मनाचे ते चिरंतन विश्रांतिस्थान आहे. मन– 'रमणे' वेगळे आणि 'गुंतणे' वेगळे! घरात मन गुंतलेले असते. त्यामुळेच घरी येणे-राहणे-विरहणे... ह्या विविध भावावस्थांवर आद्यकवि– मुकुंदराजापासून ते संदीप खरे पर्यंतच्या कवींनी आपापले मनोगत व्यक्त केले आहे. त्यांचे साक्षेपी संपादन, प्रा. शीला निपुणगे ह्यांनी करून, आस्वादक समीक्षेचा वस्तुपाठ अभ्यासकांसमोर ठेवला आहे. घर म्हणजे माहेर, घर म्हणजे आई-आजी-पत्नी-चिमणी पाखरे! घर म्हणजे विरहाचे दु:ख, तसे घरी येण्याचे अनिर्वचनीय सुख. घर म्हणजे अन्नपूर्णेच्या हातचा खमंग दरवळ! घर म्हणजे छपरांपेक्षा श्रेष्ठ मायेचे पांघरूण. घर म्हणजे त्रिखंड धुंडाळल्यानंतरही जेथे कधी एकदा जाईन आणि विसावेन अशी चिरंतन 'ओढ'! घर म्हणजे तुळशीवृंदावन आणि त्यासमोरची सांजवात! घर म्हणजे फूटपाथही! आणि घर म्हणजे शंभर मजल्यातील आपली 'वन्-बी एच्-के' सदनिकाही!!




हे केवळ ११५ काव्यबंधांचे संकलन नाही, तर घराच्या आत-बाहेरच्या-घरीदारी असलेल्या, मानवी जीवनाला अर्थ देणाऱ्या असंख्य संकल्पना, संवेदना आणि नातेसंबंधांच्या संहितांची अनेकविध रूपात प्रकटणारी विश्व व्यापून दशांगुळे उरेल अशी महासंहिता आहे. सर्वसुखाचे आगर आहे. प्रा. शीला निपुणगे यांचे सुमारे ५५ पृष्ठांचे सविस्तर चिंतन आणि रसास्वाद हे ह्या संपादित ग्रंथाचे लक्षणीय प्रकरण वाचकांना मार्गदर्शक तर आहेच; परंतु एक आगळे-वेगळे 'कवित्व निवेदन'च आहे. विशेषत: विद्यार्थ्यांच्या हाती भेट द्यावा असा हा काव्यदर्वळ आहे. मराठीच्या उपेक्षेवर एक उपाय!

◇◇◇

**मराठी कवितेतलं 'घर'**
**संपादक– प्रा. शीला निपुणगे**
शब्दरत्न प्रकाशन
२, कस्तुरी सोसायटी, ३७१ ब, शनिवार, पुणे ३०

**टी एन् परदेशी**
'गुंफण' एम् एस् सी इ बी वसाहत,
बुरुडगाव रस्ता,
अहमदनगर.

### पिंपरी-चिंचवड शाखेचे आजीव सभासद

१५७) बेंबडे रामराजे पांडुरंग
१५८) कोलेकर किसन माणिक
१५९) महामुनी रवींद्र रामचंद्र
१६०) जाधव अशोक रघुनाथ
१६१) सुतार दिगंबर अभिमान
१६२) मस्के विष्णू शाहू
१६३) श्रीराम औदुंबर चंद्रकांत
१६४) नरुटे भारत गणपत
१६५) पाटील शशिकांत नारायण
१६६) सोनकांबळे दयानंद नामदेव
१६७) होले सुनील दशरथ
१६८) मराठे दिलीप बाळकृष्ण
१६९) भुमकर ज्ञानेश्वर केशव
१७०) येलकर प्रविण लक्ष्मणराव
१७१) भिनगे धनंजय
१७२) भिनगे अनिता
१७३) मराठे प्रज्ञा प्रमोद
१७४) भसे सूर्यकांत ज्ञानोबा
१७५) गारगोट सुनील आनंदराव
१७६) बारसकर विद्या सुनील
१७७) बारसकर निरंजन सुनील



अनुक्रमणिका

## अभिनंदन

**'मसाप'च्या अध्यक्षपदी डॉ. प्र. चिं. शेजवलकर आणि उपाध्यक्षपदी डॉ. रावसाहेब कसबे यांची निवड.**



डॉ. प्र. चिं. शेजवलकर

डॉ. प्र. चिं. शेजवलकर हे ख्यातनाम व्यवस्थापनशास्त्र तज्ज्ञ म्हणून सर्वांना ज्ञात आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ते १९६१ पासून आजीव सभासद आहेत. त्यांनी मराठीतून तीन पाठ्यपुस्तके लिहिली. वाणिज्य विद्याशाखेत पीएच.डी.चा प्रबंध मराठीतून लिहिण्यास परवानगी मिळावी; हा त्यांनी धरलेला आग्रह पुणे विद्यापीठाने मान्य केला. प्रा. गं. बा. सरदार यांच्या लेखांचे समीक्षन करणारे त्यांनी लिहिलेले पुस्तक पुणे विद्यापीठाच्या एम.ए.च्या अभ्यासक्रमात पाठ्यपुस्तक म्हणून समाविष्ट झाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विश्वस्त मंडळाचे ते पाच वर्षे अध्यक्ष होते. अध्ययन, अध्यपन आणि संशोधनात रमणारे विचारवंत म्हणून त्यांची ओळख आहे.



डॉ. रावसाहेब कसबे

महाराष्ट्रातील थोर विचारवंत आणि प्रभावी वक्ते म्हणून डॉ. रावसाहेब कसबे महाराष्ट्राला सुपरिचित आहेत. संगमनेर महाविद्यालय, संगमनेर येथे राज्यशास्त्राचे प्राध्यापक म्हणून त्यांनी काम पाहिले. 'झोत', 'दलित चळवळीची वाटचाल', 'डॉ. आंबेडकर आणि भारतीय राज्यघटना', 'डॉ. आंबेडकर आणि मार्क्स', 'मानव आणि धर्मचिंतन', 'सावरकरांचा हिंदुराष्ट्रवाद' यासारख्या महत्त्वपूर्ण ग्रंथांचे ते निर्माते आहेत. ७० व्या अ. भा. दलित साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. अनेक नामांकित आणि प्रतिष्ठेच्या पुरस्काराचे ते मानकरी आहेत. ऋजुता, विधायकता आणि विनम्रता हा त्यांचा स्थायीभाव आहे.

---

### डॉ. सदानंद मोरे यांचे अभिनंदन!

संत साहित्याचे आणि घराण्याचे आदरणीय कर्ते वारसदार तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक महाराष्ट्राच्या सामाजिक व सांस्कृतिक इतिहासाचे भाष्यकार, उत्तम वक्ते म.सा.प.चे आजीव सदस्य डॉ. सदानंद मोरे यांची पहिल्या संतसाहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल म.सा.प.तर्फे हार्दिक अभिनंदन!

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त
(२१ नोव्हेंबर २०११ ते १५ फेब्रुवारी २०१२)

## — पुणे शहर —

**१) दि. २६ नोव्हेंबर २०११ : अहिताग्नी शं. रा. राजवाडे स्मृतिदिन :** 'महाराष्ट्र परंपरा आणि सुधारक' या विषयावर प्रसिद्ध वक्ते व संतसाहित्याचे अभ्यासक डॉ. रामचंद्र देखणे यांचे व्याख्यान झाले. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी डॉ. देखणे यांना पुष्पगुच्छ देऊन त्यांचा सत्कार केला. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले.

**२) दि. २९ नोव्हेंबर २०११ : कवी माधव जूलिअन स्मृतिदिन :** कवी प्रसाद शिरगावकर व वैभव जोशी यांच्या कविता सादरीकरणाचा बहारदार कार्यक्रम 'कुणीतरी आठवण काढतंय' या निमित्ताने आयोजित करण्यात आला होता. स्वागत व प्रास्ताविक परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. याच वेळी माधव जूलिअन यांच्या 'तेथे चल राणी' या कवितेचे सादरीकरण डॉ. वैद्य यांनी केले. परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी कवी शिरगावकर व जोशी यांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी या कवींचा परिचय करून दिला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व नंदा सुर्वे यांनी आभार मानले.

**३) दि. १७ डिसेंबर २०११ : ८५ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष मा. श्री. वसंत आबाजी डहाके यांचा सत्कार :** महाराष्ट्र साहित्य परिषदेचे उपाध्यक्ष मा. डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते ८५ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे निर्वाचित अध्यक्ष मा. श्री. वसंत आबाजी डहाके यांचा हृद्य सत्कार करण्यात आला. दरवर्षी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांचा प्रथम जाहीर सत्कार महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे होत असतो. परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देऊन व्यासपीठावरील मान्यवर श्री. वसंत आबाजी डहाके, डॉ. प्र. चिं. शेजवलकर व श्री. संजय भास्कर जोशी यांचे स्वागत करण्यात आले. परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी ज्येष्ठ लेखक व समीक्षक वसंत आबाजी डहाके यांचा परिचय करून दिला. त्यानंतर कार्यक्रमाचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते शाल व पुष्पहार देऊन सत्कार करण्यात आला. विविध सामाजिक, साहित्यिक संस्थांतर्फे श्री. डहाके यांचा सत्कार करण्यात आला. प्रसिद्ध लेखक संजय भास्कर जोशी यांनी आपले मनोगत व्यक्त केले. नंतर श्री. वसंत आबाजी डहाके यांनी सत्काराला उत्तर दिले. शेवटी अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. या प्रसंगी श्री. डहाके यांच्या पत्नी – ज्येष्ठ लेखिका व कवयित्री प्रभा गणोरकर उपस्थित होत्या. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले व उद्धव कानडे यांनी सूत्रसंचालन केले.

**४) दि. २३, २४, २५ डिसेंबर २०११ : पहिले युवा साहित्य-नाट्य संमेलन :** महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि राष्ट्र सेवा दल यांच्या संयुक्त विद्यमाने पहिले युवा साहित्य-नाट्य संमेलन २३, २४, २५ डिसेंबर २०११ असे तीन दिवस

तरुण साहित्यप्रेमींच्या उत्स्फूर्त प्रतिसादाने व प्रत्यक्ष सहभागाने थाटात साजरे झाले. पुण्यातील साने गुरुजी स्मारक परिसरात, प्रसिद्ध लेखक आणि संगणकतज्ज्ञ डॉ. अच्युत गोडबोले यांच्या अध्यक्षतेखाली हे संमेलन आयोजित केले होते. नव्या प्रतिभेचा शोध आणि युवा वर्गाला साहित्याकडे आकर्षित करणे हाच या संमेलनाचा हेतू होता. हे संमेलन पारंपरिक पद्धतीने न करता नवतंत्रज्ञानाशी संबंधित युवा पिढीला कलेबरोबरच करिअरचेसुद्धा मार्गदर्शन व्हावे या दृष्टीने संमेलनातील सर्व कार्यक्रमांची आखणी केली होती.

**दि. २३ डिसेंबर २०११ :** संमेलनाच्या पहिल्या दिवशी सायंकाळी ४ ते ७ महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी कविता, एकपात्री अभिनय, उत्स्फूर्त वक्तृत्व यांच्या स्पर्धा घेण्यात आल्या. सायंकाळी ७ ते १० 'कॅम्पफायर'चे आयोजन करण्यात आले होते. यात सेवा दलातील कार्यकर्त्यांचे गीतगायन व 'अनन्वय' पुणे या संस्थेच्या कलाकारांचा समावेश असलेला 'आनंदयात्री मी' हा कविवर्य मंगेश पाडगावकर यांच्या कविता, गाणी, बोलगाणी, गझल यांचा समावेश असलेला संगीतमय कार्यक्रम झाला. 'आनंदयात्री मी' या कार्यक्रमाचे संगीत संयोजन राहुल घोरपडे यांचे होते.

**दि. २४ डिसेंबर २०११ :** दुसऱ्या दिवशी उद्घाटनाचा कार्यक्रम सकाळी १० ते १२, युवा संमेलनाचे अध्यक्ष डॉ. अच्युत गोडबोले यांच्या उपस्थितीत पार पाडला त्या वेळी परिषदेचे अध्यक्ष व उद्घाटन कार्यक्रमाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार हे उपस्थितीत होते. रजनी वाघ यांनी सूत्रसंचालन केले. दुपारी १ ते ३ 'आम्ही का वाचतो, काय वाचतो?' या विषयावर महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचा सहभाग असलेला परिसंवाद झाला. प्रणव बापट, भावार्थ देखणे, सोनल जुमडे, संदीप जावीर, सुरेखा भणगे, सविता वानखेडे, महादेव कारंडे, रवी बावडेकर, अर्चना कदम यांनी भाग घेतला. मीनल मिटकर यांनी परिसंवादाचे सूत्रसंचालन केले. दुपारी ३.३० ते ५.०० – 'आम्ही चालवू हा पुढे वारसा' – या चर्चेत अध्यक्ष श्री. विवेक वेलणकर, प्रसाद चांदेकर, संजय नहार, शिरीष लवाटे, उज्ज्वला लवाटे, संतोष गवळे यांनी आपले विचार मांडले. स्मृती लोंढे यांनी सूत्रसंचालन केले. दीपक शिकारपूर यांच्या अध्यक्षतेखाली सायंकाळी ५.३० ते ७ या वेळात 'करिअर : नव्या दिशा, नव्या वाटा' या विषयावर परिसंवाद झाला. त्यात राहुल सोलापूरकर, संदीपकुमार साळुंखे, शर्वरी जमेनीस, सुषमा चव्हाण यांनी घेतला. समीक्षा चकले यांनी सूत्रसंचालन केले. यानंतर रात्री ८ ते १० – महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नाट्यशिबिरातील नाट्यप्रयोग – 'स्त्रीसूक्त' सादर करण्यात आला. या नाट्यप्रयोगाची निर्मिती 'संवाद' पुणे या संस्थेची होती. 'स्त्रीसूक्त'चे लेखन योगेश सोमण यांचे होते व नृत्यदिग्दर्शन निकिता मोघे यांचे होते.

**दि. २५ डिसेंबर २०११ :** संमेलनाच्या तिसऱ्या दिवशी सकाळी १० ते १२ या वेळात महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचा सहभाग असलेला 'समर्थ भारताचे निर्माण आणि तरुणाई' या विषयावरील परिसंवाद झाला. सूत्रसंचालन सीमा ढोरके यांनी केले. दुपारी १ ते ३ या वेळेत पराग करंदीकर, सुभाष वारे, अभिजीत कोसंबी, योगेश सोमण, नीलिमा मिश्रा यांचा सहभाग असलेला 'असे घडलो आम्ही' हा कार्यक्रम झाला. प्रसिद्ध निवेदक सुधीर गाडगीळ अध्यक्षस्थानी होते. हर्षल चव्हाण यांनी सूत्रसंचालन केले. दुपारी ३.३० ते ६.३० या वेळात झालेल्या 'प्रकाशन व्यवसाय : आव्हाने आणि संधी' या विषयावरील परिसंवादाचे अध्यक्षपद देवयानी अभ्यंकर यांनी भूषविले. या परिसंवादात साकेत भांड, मंदार जोगळेकर, क्रांती देसाई, अभिषेक जाखडे, विनोद शिरसाठ यांनी सहभाग घेतला. संदीप ढोरके यांनी सूत्रसंचालन केले. शेवटच्या सत्रात रात्री ८ ते १० कविसंमेलन झाले. उद्धव कानडे संमेलनाचे अध्यक्ष होते.



अनुक्रमणिका



कविसंमेलनात वलय मुळगुंद, कल्पना दुधाळ, नचिकेत जोशी, वैशाली मोहिते, प्रतीक पुरी, भूषण राक्षे, राजू सगर, प्रशांत चव्हाण, उत्पल चंदावर, प्रणव प्रियंका प्रकाश, आशिष भारुडे, हर्षल चव्हाण, अमोल वाडेकर, महादेव कारंडे, अभिषेक अजेत्र या कवींनी भाग घेतला. हर्षल चव्हाण यांनी सूत्रसंचालन केले.

**४) दि. १६ जानेवारी २०१२ : कै. श्री. म. माटे स्मृतिदिन :** प्रा. अनिरुद्ध देशपांडे यांचे 'श्री. म. माटे यांचे सामाजिक विचार : आजच्या संदर्भात' या विषयावर व्याख्यान झाले. परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी वक्त्यांचा सत्कार व परिचय करून दिला. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**५) दि. १७, १८ व १९ जानेवारी २०१२ : का. र. मित्र व्याख्यानमाला :** हे तीन दिवस तीन वक्त्यांची 'प्रसार माध्यमातील मराठी भाषा' या मध्यवर्ती विषयाला अनुलक्षून तीन वेगवेगळी व्याख्याने झाली. पैकी १७ जानेवारीला व्याख्यानमालेच्या उद्घाटनाचे व्याख्यान दै. सकाळचे कार्यकारी संपादक श्री. नवनीत देशपांडे यांचे 'वृत्तपत्रातील मराठी भाषा' या विषयावर झाले नंतर १८ जानेवारी रोजी 'आकाशवाणीसाठी मराठी भाषेचे लेखन' या विषयावर सौ. विनया मेहेंदळे यांचे दुसरे व्याख्यान झाले. १९ जानेवारीला 'स्टार माझा' या दूरचित्रवाणीचे निर्माते श्री. प्रसन्न जोशी यांचे 'दूरचित्रवाणीवरील मराठी भाषा' हे तिसरे व्याख्यान झाले. पहिल्या व्याख्यानाचे स्वागत व प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. वक्त्यांचा सत्कार कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केला. परिचय व आभार प्रदर्शन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. दुसऱ्या व्याख्यानाचे स्वागत व प्रास्ताविक व वक्त्यांचा परिचय कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी करून दिले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी वक्त्यांचा सत्कार केला. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले. तिसऱ्या व्याख्यानाचे स्वागत, प्रास्ताविक व वक्त्यांचा परिचय प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी करून दिला. वक्त्यांचा सत्कार कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केला व आभारप्रदर्शन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. व्याख्यानमालेच्या तिन्ही दिवसांच्या व्याख्यानांचे सूत्रसंचालन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. का. र. मित्र व्याख्यानमालेला श्रोत्यांची भरघोस उपस्थिती लाभली व प्रत्येक व्याख्यानाच्या शेवटी वक्ता व श्रोता यांच्यात प्रश्नोत्तरांच्या रूपात संवाद झाला.

**६) दि. २० जानेवारी २०१२ : माता-पितामह स्मृति कार्यक्रम :** महाराष्ट्र साहित्य परिषद व डॉ. मेधा सिधये परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने तरुण नाट्यकर्मी अभिराम भडकमकर यांच्या मुलाखतीचा कार्यक्रम झाला. सुप्रसिद्ध मुलाखतकार सुधीर गाडगीळ यांनी भडकमकरांची मुलाखत घेतली. डॉ. माधवी वैद्य, प्रा. मिलिंद जोशी, अर्चना भागवत व डॉ. मेधा सिधये यांच्या हस्ते मान्यवरांचे सत्कार करण्यात आले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी भडकमकर व गाडगीळ यांचा परिचय करून दिला आणि कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**७) दि. २१ जानेवारी २०१२ : न्यायमूर्ती म. गो. रानडे स्मृतिदिन व्याख्यान :** 'न्यायमूर्तींची साहित्यिक कामगिरी' या विषयावर प्रा. डॉ. प्र. ल. गावडे यांचे या निमित्ताने व्याख्यान झाले. प्रा. डॉ. प्र. ल. गावडे यांचा परिचय व आभारप्रदर्शन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. स्वागत कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. श्रीधर सहस्रबुद्धे यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व वक्त्यांचा सत्कार प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केला.

**८) दि. २५ जानेवारी २०१२ : श्रद्धांजली सभा :** कै. द. पं. जोशी, शांतीलाल भंडारी, वंदना

विटणकर, धैर्यशील शिरोळे, नरेंद्र बोडके व नरेंद्र सिनकर यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली सभा आयोजित करण्यात आली. श्री. आनंद लाटकर, सौ. प्रतिभा वैभव भंडारी, श्रीपाल ललवाणी, नंदा सुर्वे, प्रा. रतनलाल सोनग्रा, मनोहर सोनवणे, सौ. अंजली कुलकर्णी, डॉ. मधुसूदन घाणेकर या विविध वक्त्यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली. शेवटी उपस्थितांनी दोन मिनिटे स्तब्ध उभे राहून श्रद्धांजली वाहिली. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी अध्यक्षीय समारोप केला.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
स्थानिक कार्यवाह मसाप, पुणे.

---

## – म.सा.प. शाखा जुळे सोलापूर –

**१) दि. १२ डिसेंबर २०११ : कै. त्र्यं. वि. सरदेशमुख स्मृतिदिन :** उपाध्यक्ष नारायणकाका कुलकर्णी यांनी कै. सरदेशमुख यांच्या काही आठवणी सांगितल्या. विजापूर रस्त्यावरील स्मृतिवनात लावलेल्या वटवृक्षास प्रथमस्मृती अर्घ्य अर्पून अभिवादन करण्यात आले. यावेळी अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते, कार्याध्यक्ष सुधाकर जोशी, प्रा. मधू जामकर, डॉ. माधवी रायते, कार्यवाह गिरीश दुनाखे, मधुसूदन रायते, सुषमा रायते व कार्यकारिणी सदस्य उपस्थित होते.

**२) दि. १६ डिसेंबर २०११ :** ८५ व्या साहित्य संमेलन अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल जुळे सोलापूर शाखा व सोलापूर शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने – ज्येष्ठ कवी, समीक्षक वसंत आबाजी डहाके यांचा सत्कार करण्यात आला. यावेळी अनेक मान्यवर उपस्थित होते.

**३) दि. ७ जानेवारी २०१२ :** मॉरिशस येथील मेडिकल कॉलेजचे डीन असलेले कवी डॉ. माधव मुतालीक यांची 'माझं तसं ठीक चाललंय' ही कवितांची मैफल आयोजित करण्यात आली होती. कार्याध्यक्ष सुधाकर जोशी यांनी प्रास्ताविक केले. अध्यक्ष डॉ. रायते यांनी परिचय करून दिला. पद्माकर कुलकर्णी यांनी सूत्रसंचालन केले. कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी आभार मानले. डॉ. मुतालीक यांच्या पत्नी मैत्रेयी मुतालीक यांनी कवितांच्या मैफलीत त्यांना साथ दिली. सोलापूर साहित्य क्षेत्रातील अनेक मान्यवर या कार्यक्रमास उपस्थित होते.

**४) दि. ३० जानेवारी २०१२ : रथसप्तमी निमित्त तिळगूळ वाटप समारंभ :** उपस्थितांना तिळगूळ वाटप झाल्यानंतर 'उठा, आपल्याला शोभेल असा नगरसेवक निवडा' या विषयावर चर्चा झाली. त्यात प्रा. डॉ. श्रुती श्री. वडगबाळकर, सौ. माणिक वैद्य, डॉ. प्रा. राजकुमार मोहरकर या शिक्षणक्षेत्रातील मान्यवरांनी आपले विचार प्रकट केले. शेवटी श्री. विवेक घळसासी यांनी मार्गदर्शनपर विचार प्रकट केले. कार्याध्यक्ष सुधाकर जोशी यांनी प्रास्ताविक केले. अध्यक्ष डॉ. रायते यांनी श्री. घळसासी यांचा परिचय करून दिला. उपाध्यक्ष नारायणकाका कुलकर्णी यांनी स्वरचित कवितेतून हाच परिचय करून दिला. गिरीश दुनाखे यांनी सूत्रसंचालन केले. आभारप्रदर्शन श्रीकांत कुलकर्णी यांनी केले. डॉ. माधवी रायते यांनी पसायदान म्हटले.

**कार्यवृत्त नोंद : गिरीश दुनाखे**
कार्यवाह म.सा.प. शाखा, जुळे सोलापूर



अनुक्रमणिका

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

खंड सातवा (१९५०-२०००) सुख्य संपादक : प्रा. रा.ग. जाधव



मूल्य । ७०० रु. पृष्ठसंख्या । ७५० (छायाचित्रांसहित)

भाग पहिला - विषय । लेखक

**सांस्कृतिक पार्श्वभूमी** । वसंत आबाजी डहाके **बालवाङ्मय** । डॉ. न. म.जोशी, डॉ. लीला दीक्षित
**प्रवासवर्णन** । डॉ. चंद्रकांत वर्तक, डॉ. वृन्दा भार्गवे **चरित्रवाङ्मय** । डॉ. जयंत वष्ट
**स्त्रीवादी वाङ्मय** । डॉ. अश्विनी धोंगडे **लोकवाङ्मय** । डॉ. मधुकर वाकोडे
**विज्ञान वाङ्मय** । निरंजन घाटे **अदिवासी वाङ्मय** । डॉ. विनायक तुमराम
**जैन वाङ्मय** । प्रा. धनंजय शहा **ख्रिस्ती वाङ्मय** । डॉ. सिसिलिया कार्व्हालो
**मुस्लीम वाङ्मय** । डॉ. अजिज नदाफ **जनसाहित्य** । डॉ. सुभाष सावरकर
**संगीतविषयक वाङ्मय** । डॉ. दिग्विजय वैद्य **कोशवाङ्मय व सूचिवाङ्मय** । डॉ. स. ग. देव
**निर्देशसूची** । डॉ. मीरा घांडगे



मूल्य । ८०० रु. पृष्ठसंख्या । ७८७ (छायाचित्रांसहित)

भाग दुसरा

**काव्य** । डॉ. प्रभा गणोरकर, डॉ. नीलिमा गुंडी **नाटक आणि एकांकिका** । डॉ. वि. भा. देशपांडे
**ग्रामीण वाङ्मय** । डॉ. एकनाथ पगार **भाषाविज्ञान** । डॉ. विजया देव **व्याकरण** । डॉ. लीला गोविलकर
**वाङ्मयीन नियतकालिके** । डॉ. स्वाती कर्वे **चित्रकला -शिल्पकलाविषयक वाङ्मय** । साधना बहुळकर
**मराठी साहित्य आणि चित्रपट** । सुलभा तेरणीकर **निर्देशसूची** । शिल्पा सबनीस



मूल्य । ७०० रु. पृष्ठसंख्या । ६४० (छायाचित्रांसहित)

भाग तिसरा

**कादंबरी** । डॉ. हरिश्चंद्र थोरात **कथा** । प्रा. म.द. हातकणंगलेकर, डॉ. अरुणा दुभाषी
**ललितगद्य** । डॉ. आनंद यादव, डॉ. वीणा देव **विनोदी वाङ्मय** । डॉ. गो.मा. पवार ,मंगला गोडबोले
**लोकप्रिय साहित्य** । डॉ. रेखा इनामदार -साने **संस्कृत साहित्यशास्त्रीय वाङ्मय** । डॉ. निशिकांत मिरजकर
**सौंदर्यशास्त्रीय वाङ्मय** । डॉ. वसंत पाटणकर **इतिहास-वाङ्मय** । डॉ. राजा दीक्षित
**संपादित वाङ्मय** । डॉ. वंदना बोकील- कुलकर्णी **निर्देशसूची** । शिल्पा सबनीस



मूल्य । ७०० रु. पृष्ठसंख्या । ६५२ (छायाचित्रांसहित)

भाग चौथा

**दलित वाङ्मय** । डॉ. गंगाधर पानतावणे **समीक्षा** । प्रा. दिगंबर पाध्ये, वसंत आबाजी डहाळे
**आत्मचरित्र** । डॉ. मेधा सिधये, डॉ. उज्वला गोखले **अनुवाद वाङ्मय** । डॉ. मृणालिनी गडकरी
**विद्रोही वाङ्मय** । प्रा. रणजित परदेशी **वैचारिक वाङ्मय** । प्रा. ग. प्र. प्रधान
**निर्देशसूची** । शिल्पा सबनीस






**Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : January to March 2012**
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*



बुक-पोस्ट

येथें वाग्यज्ञे तोषावें
महाराष्ट्र साहित्य

प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**





अनुक्रमणिका